# नवभारत

वर्ष २१ वे ]    जून १९६८    [ अंक ९



वार्षिक वर्गणी ९ रु. ]    [ किरकोळ अंक १ रु.








नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष एकविसावे | अंक नववा

# नवभारत

जून १९६८

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा– मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २
फोन नं. ३५४८५४






श्री. प्र. रा. देशमुख

# सिंधु लिपीचे आणि मुद्रांचे वाचन

## अयशस्वी प्रयत्न

सिंधुमुद्रा उत्खनित होऊन चाळीस वर्षांचा कालावधी लोटला. जगातील प्रथमश्रेणीचे दीर्घोद्योगी व बुद्धिमान विद्वान त्या वाचण्याचा प्रयत्न करीत आहेत. परंतु त्यांचे वाचन करण्यात कोणालाही यश लाभले नाही. काही पाश्चात्य व काही भारतीय विद्वानानी आपण सिंधुमुद्रा वाचल्या असा दावा केला आहे. परंतु सरतेशेवटी अयशस्वी कल्पना अथवा तर्क यापेक्षा त्याला जास्त किंमत नाही असे आढळून आले. सिंधुमुद्रा वाचण्याच्या मार्गात एवढया मोठ्या अडचणी आहेत की त्या पुढे अत्यंत बुद्धिमान विद्वानांची बुद्धी लुळी पांगळी होऊन हार खाते.

## अडचणी

सिंधुमुद्रांची संख्या फार मोठी आहे. इतक्या जास्त प्रमाणात भाजलेल्या खापराच्या मुद्रा का निर्माण व्हाव्या व त्यात काय लिहिले असावे हाच प्रश्न प्रथम निर्माण होतो व कितीही विचार केला तरी त्याचे निश्चित उत्तर मिळत नाही. त्या उत्पन्न होण्याच्या कारणाबद्दल विद्वानी आपल्या कल्पनांना स्वैर सोडून खूप तर्क केले व वाद मांडले परंतु त्यांच्या स्वरूपाची निश्चित कल्पना येऊ शकली नाही. काहींच्या मते त्या समुद्रावरील व्यापारासाठी निर्माण झाल्या असाव्या तर काहींच्यामते त्या अथर्ववेदात सांगितल्या प्रमाणे ताईत ( amulet, ) म्हणून निर्माण झाल्या असाव्या. भारतात आपण सिंधुमुद्रा वाचल्या आहेत असा दावा करणाऱ्या एका सद्गृहस्थाने तर त्या सिंधुविद्यापीठातील प्राथमिक विद्यार्थ्यांना व्याकरणाचे पाठ देण्यासाठी निर्माण झाल्या आहेत असे म्हटले आहे. हे सर्वच केवळ कल्पनेवर अधिष्ठित तर्क.

नुसती मुद्रांचीच संख्या मोठी नाही तर त्यातील चिन्हांचीही संख्या फार मोठी आहे. एकट्या हरप्पा साइन मॅनुअलमध्ये ४५० वेगवेगळया चिन्हांची नोंद आहे. इतक्या चिन्हांना उच्चार देणे अथवा त्यांचे उच्चार शोधून काढणे जवळ जवळ अशक्यप्राय गोष्ट आहे. मुद्रा आणि त्यातील चिन्हांच्या बाहुल्यामुळे निर्माण झालेला गोंधळ मुद्रांच्या लघुत्वामुळे आणखीच वाढतो. लहानात लहान मुद्रा एका चिन्हाची तर मोठ्यात मोठी मुद्रा अवघी सोळा चिन्हांची. इतक्या लहान मुद्रात काय सांगितले असावे याबद्दल कोणताही निश्चित तर्क करता येत नाही. त्यात व्यक्तींची नावे आहेत, शहरांचीं नावे आहेत, मंत्र आहेत, समुद्रगमनाचे करार आहेत, व्यापाराचे करार आहेत, नौकांची नावे आहेत, की सरकारी आज्ञा आहेत अथवा यापैकी काहीच नसून वेगळेच काहीतरी आहे, या कशाबद्दलही निश्चित तर्क करता येत नाही.

या सर्वांवर कळस करणारी, गोंधळ निर्माण करणारी गोष्ट म्हणजे चित्रासारखी विचित्र दिसणारी चिन्हगुंफण होय. माणूस, मासा, पान, षट्पाद कीटक, वटवाघूळ, टोळ, बदक यासारखी चिन्हे पाहून ती काहीतरी चित्रलिपी असावी असा समज निर्माण होतो. त्या उलट चौकोन व अर्धवर्तुळासारखे आकार पाहून ती चित्रलिपी नसावी असे वाटते. काही विद्वानांनी आपल्या कल्पनेने चित्रांना अर्थ देऊन काढलेले अर्थ पाहून फार गंमत वाटल्याखेरीज रहात नाही. सिंधुलिपी जितकी जितकी गूढ होत जाते तितकी तितकी मनुष्याची बुद्धी ते गूढ उकलण्याठी प्रयत्नशील होते. कधी कधी हे प्रयत्न नुसत्याच कल्पनेवर आधारित असल्यामुळे विनोदाचे विषय होतात ते वेगळे. पानाचे चित्र पाहून ‘ अरे हे तर पान ’ असे आश्चर्य व्यक्त करून सिंधुभाषेत पान हा आपल्या भाषेतील शब्द आहे असे जाहीर केलेले ऐकून व त्यावरही विश्वास ठेवणारे लोक आहेत हे पाहून गंमत वाटल्याशिवाय रहात नाही. त्याचप्रमाणे हातात धनुष्यबाण असलेल्या माणसाचे चित्र पाहून त्याचा ‘ सैनी ’ असा केलेला अर्थ व बाणाला एका टोकाचे ऐवजी तीन टोके असलेले पाहून तो ‘ कामदेव ’ आहे असे तर्क वाचले

म्हणजे गंमत वाटेल. असे तर्क कितीही हास्यास्पद आणि वेडगळ दिसत असले तरी सिंधुमुद्रांबद्दल कुतूहल एवढे आहे की त्यांची देखील स्तुती करणारे लोक केवळ सामान्य लोकातच नाहीत तर मोठ्या विद्वानातून देखील आढळतात.

दोन अथवा जास्त चिन्हे एकत्र गुंफलेली पाहून काही विद्वान ती भारतात परंपरेने चालू असलेली जोडाक्षरे असावीत असा निर्वाळा देतात. सिंधुलिपी वाचण्याच्या मार्गात अशा अनुल्लंघनीय अडचणी आहेत.

सिंधुचिन्हे अक्षरे आहेत की नाही हेच आपल्याला माहीत नाही. एवढेच नव्हे तर वाचन उजवीकडून डावीकडे अथवा डावीकडून उजवीकडे करावयाचे हेही माहीत नाही.

## भाषेची अडचण

ह्या सर्व अडचणींपेक्षा सर्वात मोठी अडचण भाषेची आहे. सिंधुमुद्रांत कोणती भाषा आहे हे आपणास माहीत नाही आणि भाषा माहीत असल्याशिवाय मुद्रा वाचण्याचा प्रयत्न करता येत नाही. अशा परस्परावलंबी ह्या दोन अज्ञात घटकावर सिंधुलिपीचे वाचन अवलंबून आहे. सुमेरमध्ये ७–८ सिंधुमुद्रा उपलब्ध झाल्या आहेत. त्यावरुन प्राचीन सुमेरिअनाना सिंधुभाषा अवगत असावी व प्राचीन सुमेरीअन भाषेच्या साह्याने सिंधुमुद्रा वाचता येतील असा विद्वानांचा समज होता. प्रो. लँगडनचेही तसेच मत होते. कर्नल वॅडेल नावाच्या फ्रेंच गृहस्थाने सुमेरिअन इतिहासाशी प्राचीन भारताचा संबंध दाखवून प्राचीन सुमेरिअन भाषेच्या साह्याने सिंधुमुद्रा वाचण्याचा प्रयत्न केला व एक दोन मुद्रा वाचल्या असेही दाखविले. त्यात ' भृगु ' शब्द आढळला असे त्याचे म्हणणे. औशिजः कक्षीवान हा उशजा नावाच्या दासीला दीर्घतमा नावाच्या आंधळ्या ऋषीपासून झालेला मुलगा. ' उशजा ' हा सुमेरिअन भाषेतील दासी या अर्थाचा शब्द आहे असे त्यांचे म्हणणे. लॅ. वॅडेलने तर्काने एक दोन मुद्रा मधून त्याच्या कल्पनेप्रमाणे व हवे असलेले शब्द काढले तरी त्याची गती त्यापेक्षा जास्त झाली नाही. लॅ. वॅडेलच्या वाचनाचा पाया कल्पना व सुमेरचा प्राचीन भारताशी असलेला संबंध एवढाच असल्यामुळे त्यास सिंधुमुद्रा वाचण्यात यश आले नाही. त्याचे वाचन संपूर्णतः काल्पनिक आहे.

सुमेरिअन भाषेच्या साहाय्याने सिंधुमुद्रा वाचता येतील ही कल्पना लँगडनने बदलली ! काही सिंधुचिन्हे व अशोककालीन ब्राह्मी लिपी यात साम्य असल्याचे लँगडनच्या निदर्शनास आले. त्यावरून सिंधुलिपी व ब्राह्मी लिपी यांचा निकट संबंध असावा असे त्याचे म्हणणे. प्रो. लँगडनचे म्हणणे असे ' Undoubtedly the great lapse of time between there seals of Indus valley and the age of Asoka will be regarded as a fatal objection. But the epigraphical material may be found and the evolution of the old pictorial writing into the late Indian alphabet will be traced. If the excavations in Indus valley supply us with inscriptions which contain cousecutive sentences and not mere proper names and titles, perhaps the key to interpretation of this script may be discovered. It is of course possible that this is not an Indo Germanic language. So early a date ( 3200 to 2800 B. C. ) for existance of an Aryan civilisation in India is confidently asserted to be pure legend and dream of a national tradition.

With the epigraphical material alone I shuld have dated the script not earlier than 800 B. C. But the Mesopotamian seals are also decisive on the problem of chronology. Lagash and Uma disappeared from history before 2000 B. C. and three of the seals were found there. If inscriptions of no other type are










found in excavations of Indus Valley then we must suppose that the history of this fine culture ends with these monuments, and the vast expanse of years between the catastrophe and the invasion of the Aryans is filled with uncertain tradition. If however this script was personal and finally issued into alphabets of Budhistic period, it proves that the Aryans must have had intimate contact with those founders of culture in India. In any way we may look at the problem, the Aryans in India are far more ancient than history admits. Their migration across Anotolia, where traces of them are found in the inscriptions of the Hittite capital as early as seventeenth century is an hypothesis entirely contradictory to the new situation revealed by these discoveries in the Indus valley. For more likely is it that the Aryons in India are the oldest representatives of the Indo Germanic. "

लँगडनच्या मते सिंधुलिपी आणि ब्राह्मी लिपी यांचा संबंध आहे. त्याच्या मते ब्राह्मी लिपी आर्यांची आहे. म्हणून आर्यांचा आणि सिंधुसंस्कृतीतील लोकांचा संबंध असला पाहिजे. आर्यांचा सिंधु लोकाशी संबंध यावयास आर्य मॅक्समुल्लरने ठरविलेल्या काळापेक्षा पुष्कळच पूर्वी म्हणजे इ. स. पूर्व ३२०० ते २८०० च्या दरम्यान यावयास पाहिजे. हे लँगडनचे म्हणणे खरे आहे. आर्य भारतात इ. स. पूर्व ३३०० मध्ये आले हे आपण अन्यत्र[१] दाखविले आहे. लँगडनचे दुसरे म्हणणे आपणास मान्य नाही. ब्राह्मी लिपीचे सिंधुलिपीशी साम्य आहे ही गोष्ट खरी असली तरी लँगडन म्हणतो त्याप्रमाणे ब्राह्मी लिपी आर्यन नाही. सिंधुलिपी आर्यांच्या शत्रूंची होती आर्यांशी संबंधित नसलेल्या बौद्ध मालिकेतून ब्राह्मी लिपी पुढे आली. ब्राह्मीलिपी ही सिंधुलोकाची सातत्याने चालत आलेली लिपी होय. आर्यांनी ब्राह्मी लिपी घेऊन त्यात सुधारणा करून देवनागरी बनविली.

लँगडनच्या काही कल्पना चूक असल्या व त्याला सिंधुलोकांच्या भाषेबद्दल कल्पना नसली तरी वरील उताऱ्यातील त्याचे विचार निस्संशय मार्गदर्शक आहेत. त्याचा विचार आपण पुढे करू. तूर्त एवढेच दाखवावयाचे आहे की सिंधुमुद्रांच्या भाषेबद्दल कोणासही नीट कल्पना नाही. जे सिंधुसंस्कृतीतील लोक द्राविडीअन आहेत असे मानतात त्यांच्यामते त्यांची भाषा प्राचीन द्राविडीअन असावी. त्याच्या उलट दुसरे काही जे त्यांची लिपी ब्राह्मीशी आणि भारतातील लोक लिपीशी संबंधित आहे असे समजतात ते त्यांची भाषा संस्कृत असावी असे समजतात. आपले मत या दोन्ही मतापेक्षा भिन्न आहे. सिंधुसंस्कृतीतील लोक आर्यन नसून त्यांचे द्राविडिअन शत्रू होते ही गोष्ट जितकी खरी तितकीच त्यांची भाषा भारतातील संस्कृत, व देशीभाषांची जननी आहे हीही गोष्ट खरी आहे. ही गोष्ट आपण अन्यत्र विस्ताराने दाखविली आहे. आपल्या मते रशियापासून भारतापर्यंत व मधील सर्व देशात एकच बोलभाषा प्रचारात होती. तिला आपण प्राकृत (original) म्हटले आहे. आर्यांचीही भाषा प्राकृतच होती. परंतु ऋचा रचण्यासाठी आणि यज्ञात उपयोगात आणण्यासाठी त्यानी मूळ प्राकृत शब्दावर संस्कार करून धार्मिक उपयोगासाठी संस्कृत निर्माण केली. ही गोष्ट आर्य भारतात येण्यापूर्वी फार प्राचीन काळी सुरू झाली व अगदी अलिकडच्या काळापर्यंत चालू होती. इन्डोजर्म्यानिक भाषादेखील मूळ प्राकृत मधूनच निर्माण झाल्या. सिंधुलोकांची भाषा प्राकृत असून संस्कृत, भारतातील देशीभाषा आणि दक्षिणेकडील दक्षिणभारतीय म्हणून ओळखल्या जाणाऱ्या सर्व भाषा मूळ प्राकृत मधून निघाल्या. ह्याबद्दल

१. 'सिंधुसंस्कृती ऋग्वेद व हिंदुसंस्कृती' या पुस्तकात.



अनुक्रमणिका






आपण अन्यत्र विस्ताराने लिहिले आहे आपला तर्कही इतर तर्काप्रमाणे सिंधुलिपीच्या वाचनावरच अवलंबून आहे. सिंधुलिपी वाचली जाऊन तीतून प्राकृत भाषा निघेपावेतो आपले म्हणणे सिद्ध होणार नाही. तसे सिद्ध झाल्यावर आतापावेतो भारतात आणि अन्यत्र उराशी बाळगलेले समज चुकीचे ठरतील.

येथे भाषेचा विचार एवढ्यासाठीच केला की सिंधुमुद्रा वाचण्याच्या मार्गात ज्या अनुल्लंघनीय अडचणी आहेत त्यात भाषेची अडचण सर्वात महत्वाची आहे. सिंधुमुद्रा अथवा लेख कोणत्या भाषेत आहे ते आपणास माहीत नाही. आणि भाषा माहीत असल्याशिवाय सिंधुलिपी वाचता येत नाही अशी ही महत्वाची अडचण आहे. सिंधुलिपी वाचण्यास उपयुक्त होईल अशी कोणतीही गोष्ट उपलब्ध नाही अशा परिस्थिती आपणास सिंधुलिपी वाचण्याचा प्रयत्न करावयाचा आहे.

## वाचन बरोबर आहे अथवा नाही ते कसे पहावे

सिंधुमुद्रा वाचण्यास आणखी एक फार मोठी अडचण आहे. समजा एकाद्या गृहस्थाने असा दावा केला की मी सिंधुमुद्रा वाचल्या व कल्पनेने भरमसाट काहीतरी अर्थ ठोकून दिले तर त्याचे अर्थ बरोबर आहेत अथवा नाहीत असे म्हणण्यासाठी आपणाजवळ काय साधन आहे ? अर्थात् काहीच नाही. याचे वाचन बुद्धीला पटत नाही म्हणून आपण विश्वास ठेवणार नाही ही गोष्ट वेगळी. दुसरे जास्त उदार मनाचे असतील ते म्हणतील की ह्याचे वाचन चुकीचे आहे असे म्हणण्यास आपल्याजवळ काय पुरावा आहे कदाचित् ते बरोबरही असेल. आणि तिसरे असे म्हणणारे निघतील की याच्या काही गोष्टी आपणाला पटतात म्हणून ते बरोबर असण्याची शक्यता आहे. हे मी काही काल्पनिक लिहितो असे नाही. सिंधुमुद्रांच्या बाबत हे सारे घडले आहे. सिंधुमुद्रांचे वाचन करण्याचा दावा करून त्यावर पुस्तक लिहिणाऱ्या एका गृहस्थाने चिन्हाना चुकीचे उच्चार देऊन त्यातून अर्थशून्य ध्वनी काढले व त्यांना स्वतःच्या कल्पनेने वाटेल तसे अर्थ दिले. अर्थातच अशा प्रयत्नांना वाचन म्हणता येत नाही व ते सर्व चुकीचे झाले यात आश्चर्य नाही.

अशा प्रकारच्या वाचनाची काहीशी कल्पना यावी म्हणून त्याने केलेल्या एक दोन मुद्रांचे वाचन येथे देत आहे :

A–N–KK–L. Ĕl–H͡AT͡A–T–H-R-N←

ही अक्षरे अशी आहेत की प्रथमतः ती वाचता येत नाहीत. दुसरे त्यातून कोणतेही अर्थवाही शब्द निघत नाहीत व अर्थपूर्ण वाक्य होत नाही. भाषा कोणती आहे त्याचा पत्ता नाही. हे चुकीचे काहीतरी अर्थशून्य ध्वनी आहेत. त्याचा अर्थ वाचकाने 'Apprehension of Murder' असा दिला आहे. दुसऱ्या एका मुद्रेचे वाचन असे आहे –

A-S Ṛ – iic KKL – L – RṚĕI – TT – KĀMA ←

हेही निरर्थक ध्वनी आहेत. वाचक याचा अर्थ देण्याच्या भरीस पडला नाही. त्यातील धनुष्य बाण घेतलेल्या आकृतींला ' काम ' म्हटले आहे.

तिसरी एक मुद्रा अशी वाचली–

E – H – SH SAINI – N – KH – D

हाही असाच एक अर्थशून्य ध्वनिसमुच्चय आहे. त्याचाही अर्थ वाचकाने दिला नाही. फक्त धनुष्यबाण घेतलेल्या माणसाच्या आकृतीला ' सैनी ' म्हटले आहे.

अशा प्रकारचे वाचन वाचन नव्हे. ती आत्मवंचना व परवंचना होय. मुद्रावाचनाच्या कुतूहलामुळे लोक अशीही पुस्तके विकत घेतात. वरीलसारखे वाचन असलेल्या ६४ पानाच्या चोपड्याची किंमत पंधरा रुपये आहे.

जे वाचन सुसूत्रित पद्धतीवर आधारले आहे, ज्यातून अर्थवाही शब्द निघतात, आणि शब्दातून विवक्षित भाषा प्रतीत होते तेच वाचन बरोबर समजावे. त्यात एका प्रकारच्या चिन्हाला एकच विवक्षित ध्वनी असावा व तो त्या प्रकारच्या सर्व चिन्हाना लागावा. त्यातून अर्थवाही शब्द निघावे. ते जगातील ज्ञात असलेल्या कोणत्यातरी भाषेतील शब्द असावे. म्हणजे शब्दातून भाषा प्रतीत व्हावी. असे झाले तरच चिन्हाना दिलेले ध्वनी बरोबर आहेत असे समजावे. चिन्हाना दिलेले ध्वनी बरोबर नसले तर त्यातून वर दर्शविल्याप्रमाणे निरर्थक ध्वनी निर्माण होतात. ते वाचन नव्हे.










# सिंधु लिपीचे आणि मुद्रांचे वाचन

## आपली पद्धती

सिंधुमुद्रांचे वाचन करताना सर्वांत महत्वाची गोष्ट चिन्हग्रंथीच्या आकृतीतील विवक्षित चिन्हे वेगळी करणे व मूलगामी चिन्हाना सुसूत्रित पद्धतीने ध्वनी देणे ही होय. ध्वनी काल्पनिक अथवा मनास वाटतील तसे नसावे. त्यास काही पद्धत असावी. ही पद्धति शोधून काढणे ही सर्वांत मूलभूत महत्वाची गोष्ट आहे. त्यासाठी आपण प्रथम लिपी कशी निर्माण झाली असेल याचा विचार करू. अर्थातच ही क्रिया दीर्घ काळपर्यंत चालली असावी. शिवाय कालानुक्रमाने लिपी भाषेच्या मानाने अगदीच अलीकडे व थोडी थोडी निर्माण झाली असावी. आपण आपणासाठी आयती बनविलेली मूळाक्षरे शिकतो आणि ती कशी निर्माण झाली असावी याचा आयुष्यात कधीही विचार करीत नाही.

आज जरी आपणास त्याचे महत्त्व प्रतीत होत नसले तरी लिपी हा पूर्व मानवाचा अत्यंत महत्वाचा शोध आहे. आपल्या मनातील विचार व्यक्त करण्यासाठी वाचा आणि त्यांचे ग्रहण करण्यासाठी श्रोत्र ही इन्द्रिये आहेत. लिपीच्या अभावी आपले विचार व्यक्त करण्यासाठी आपणास वाचेवर व ते ग्रहण करण्यासाठी श्रोत्रावर अवलंबून रहावे लागते. तसे करण्यात, विचार व्यक्त करण्यात किती अडचणी निर्माण होतात याची कल्पना आपणास नाही. प्राथमिक माणसाने ध्वनीना आकार देऊन श्राव्या–ऐवजी दृश्य बनविले. वाणीचे काम हाताला व श्रोत्रांचे काम नेत्राना दिले. अशा प्रकारे लिपी सिंधुलिपीच्या रूपाने आपल्या समोर आहे. त्यांचे ध्वनी आपणास माहीत नसल्यामुळे त्या अर्थशून्य आकृती आहेत. ध्वनीला आकार देण्याचे प्राथमिक माणसाचे कार्य काहीसे सोपे होते. त्या प्रकारच्या वस्तूवरून, त्यांच्या नावावरून, ध्वनी वरून व काहीसे लेखनाच्या सोयीसाठी मनाप्रमाणे ध्वनीला आकृती देण्याची प्राथमिक माणसास मुभा होती. आपणावर मात्र ज्यांचे ध्वनी माहीत नाहीत त्या आकृतीना बरोबर ध्वनी देण्याचे अथवा त्यांचे अज्ञात ध्वनी बरोबर शोधून काढण्याचे अत्यंत दुष्कर कार्य पडले आहे. ध्वनी देण्यात आपली थोडी जरी चूक झाली तरी अज्ञात लिपीचे गूढ आपणास उलगडणार नाही.

लिपीच्या उत्पत्तीबद्दल विद्वानात वेगवेगळे समज आहेत. मूळ लिपी वेगवेगळ्या असून त्यातून जगात प्रचलित असलेल्या लिपी निर्माण झाल्या असे त्यांचे मत आहे. आमच्या मते मात्र जगातील लिपी भिन्न दिसत असल्या तरी त्या मूळ एकाच लिपीतून निर्माण झाल्या असाव्या. लिपी तयार करणे हे भाषेच्या तुलनेने अलिकडचे व तत्कालीन अत्यंत पुढारलेल्या समाजातील फार कठीण काम असल्यामुळे ती एका ठिकाणी निर्माण होऊन जगभर पसरली असावी. निरनिराळ्या लिपी निरनिराळ्या ठिकाणी झाल्या नसाव्या. ही गोष्ट निदान जगातील काही महत्वाच्या लिपीबाबत तरी नक्कीच खरी आहे. निरनिराळ्या लिपीतून उत्पन्न झाल्या असा समज असलेल्या जगातील चार अत्यंत महत्वाच्या लिपी घेऊन त्या एकाच लिपीतून निर्माण झाल्या हे दाखऊ. आपण निवडलेल्या लिपी ब्राह्मी, देवनागरी, परशिअन, व रोमन ह्या जगातील अत्यंत महत्वाच्या लिपी होत. निदान ह्या चार लिपी तरी एकाच लिपीतून निर्माण झाल्या आहेत. आणि ती लिपी सहा हजार वर्षांपूर्वी भारतात प्रचलित असलेली सिंधुलिपी होय. ह्या परस्परापेक्षा अत्यंत भिन्न दिसणाऱ्या लिपी एकच असून त्यांचे मौलिक उच्चार व आकार सारखेच आहेत हे दाखविता येते. हे उच्चार व आकार सारखे आहेत हे पाहिल्यानंतर त्रैराशिकाच्या नियमाने सिंधु लिपीतील त्याच आकाराच्या चिन्हाचा तोच ध्वनी निश्चित होतो. वर निर्देश केलेल्या चार लिपींचे आकार आणि उच्चार सारखे आहेत व ते सर्व आकार सिंधुचिन्हातील त्याच आकृतीच्या चिन्हातून निघाले आहेत व त्यावरून सिंधुचिन्हांचा उच्चार निश्चित होतो. ह्या सिंधुमुद्रा वाचण्याचा पाया असलेल्या मूलभूत समस्येची सिद्धता वेगळी न करता सिंधु लिपीच्या अक्षरांचे वाचन करतानाच करू.

वरील विवेचनावरून एक गोष्ट निश्चितपणे ध्यानात आली असेल की आपल्या ह्या पद्धतीमुळे वर निर्देश केलेल्या कोणत्याही अडचणीचा बाध येऊ शकत नाही. ऐतिहासिक शिलालेख अथवा ताम्रपट वाचण्याच्या पद्धतीपेक्षा सिंधुलिपी वाचण्याची आपली पद्धति अत्यंत भिन्न असल्यामुळे त्यात भाषेची








अडचण आड येत नाही. आपल्या पद्धतीने वाचन करण्यास भाषा जाणण्याचे मुळीच कारण नाही चिन्हांचे ध्वनी एकापुढे एक मांडून ते दोन्ही कडून वाचावे आपण दिलेले उच्चार बरोबर असतील तर त्यातून अर्थवाही शब्द आणि भाषा आपोआप निघावयास पाहिजे. तरच आपले वाचन बरोबर आहे असे म्हणावे. ह्या पद्धतीत भाषा अथवा लेखनाची दिशा जाणण्याचीही जरूरी नाही. त्या आपोआपच निर्धारित होतात. तसेच मुद्रात काय सांगितले आहे ते कळण्याची अथवा त्याबद्दल अंदाज असण्याचीही जरूरी नाही, मुद्रा वाचल्यानंतर त्यातील मजकूर आपोआपच कळेल.

## सिंधुलिपी आणि सिंधुमुद्रा

सिंधुमुद्रा बाहुल्याने उपलब्ध झाल्या आहेत व त्यांच्याबद्दल कुतूहलही फार असल्यामुळे जागतिक विद्वानांचे लक्ष त्यांच्या वाचनावरच केंद्रित झाले आहे, व सिंधुलिपी म्हणजे सिंधुमुद्रातील लिपी असा दृढ समज निर्माण झाला आहे. परंतु हा समज बरोबर नाही. सिंधुमुद्रा व्यतिरिक्त आणखीही सिंधुलिपीतील महत्वाचे लेख उपलब्ध झाले आहेत. त्यांच्याकडे विद्वानांचे वेधावे तितके लक्ष वेधले नाही अथवा मुळीच लक्ष गेले नाही असे म्हटले तरी चालण्यासारखे आहे. मोहेंजोदारो व्हाल्युम नं. ३ मध्ये प्लेट नं. ७३ मधील १ व ३ व प्लेट नं. ९० मधील ५५८ ते ५६० या पाच प्लेटसमध्ये रांजणाच्या तुकड्यावर सिंधुलिपीत पाच लेख आहेत. ही लिपी सिंधुमुद्रातील लिपीपेक्षा काहीशी वेगळी असून तिचे ब्राह्मी लिपीशी बरेच साम्य आहे. हे साम्य इतके आहे की वरील प्लेटसवर ब्राह्मी लेख असा मथळा दिला आहे. तथापि ही लिपी ब्राह्मी नसून सिंधुलिपीच आहे हे निश्चित. सिंधुलिपी लेखकाच्या उजवीकडून डावीकडे म्हणजे उर्दू किंवा परशीअन लिपीप्रमाणे लिहिली जाते. ब्राह्मी त्याच्या उलट देवनागरीप्रमाणे लेखकाच्या डावीकडून उजवीकडे लिहिली जाते. हा या दोन लिपीतील महत्त्वाचा फरक आहे. सिंधुलेखातील लिपी लेखकाच्या उजवीकडून डावीकडे लिहिली आहे. या लेखातील कांही अक्षरे ब्राह्मी अक्षराशी जुळत असली तरी बरीचशी अक्षरे मुद्रातील सिंधु चिन्हाशी जुळतात. तिसरे आणि सर्वात महत्वाचे कारण असे आहे की सिंधुमुद्रावर सातत्याने दिसणारे वृषभाचे चिन्हही यापैकी एका लेखावर कोरले आहे.

वास्तविक ही लिपी सिंधुलिपी आहे की ब्राह्मी लिपी आहे असा वाद उत्पन्न होण्याचे कारण नाही. ज्या रांजणाच्या तुकड्यावर ही लिपी आढळते ते रांजणाचे तुकडे निश्चितपणे सिंधुमातीच्या भांड्यापैकी आहेत. उत्खनन करणाऱ्या मॅकेचे असे निश्चित मत आहे की हे रांजणाचे तुकडे सिंधुमातीच्या भांड्यापैकी दुसऱ्या प्रकारात म्हणजे जे वरील व्हाल्युम मधील प्लेट नं. ९० मधील १ ते ८ मध्ये दर्शविले आहे त्यात समाविष्ट होतात. सिंधुमातीच्या भांड्यावर असलेले हे लेख सिंधुलिपी पेक्षा इतर लिपीतील असूच शकत नाही.

ही लिपी मुद्रातील चिन्हगुंफणापेक्षा वेगळी दिसत असली तरी वेगळी नाही. मुद्रातील चिन्हगुंफण ही नित्याच्या उपयोगातली सिंधुलिपी नाही. मुद्रातील चिन्हगुंफण सिंधुमुद्रात असलेले नौकानयनाचे करार गुप्त राखण्याकरता प्राथमिक चिन्हांचे ओळखू येऊ नये म्हणून चित्रासारखे बनविलेले गुंफण होय. सिंधुलिपीचे प्रातिनिधिक स्वरूप वरील रांजणाच्या तुकड्यावरील लेखातून प्रतीत होते. ती त्यांची नित्याच्या उपयोगातली लिपी आहे. मुद्रातील चिन्हगुंफण नव्हे. तीतूनच ब्राह्मी, देवनागरी भारतातील सर्व प्रादेशिक लिपी द्राविडीअन लिपीसुद्धा निर्माण झाल्या. रोमन आणि परशीअन लिपीही तिच्यातूनच निर्माण झाल्या. वरील उताऱ्यात दर्शविल्याप्रमाणे ह्या लिपीचा संबंध ब्राह्मी लिपीशी सरळ जुळतो. मुद्रातील चित्रगुंफण का निर्माण झाली व प्राथमिक चिन्हे वेगळी करून कशी वाचावी याचा विचार सिंधुमुद्रांचे वाचन करताना पुढे करू.

वर उद्धृत केलेल्या प्रो. लँगडनच्या उताऱ्यात त्याने सिंधु उत्खननातून जर आपणास संपूर्ण वाक्ये मिळाली आणि नुसतीच विशेष नामे मिळाली नाहीत तर आपणास सिंधुलिपीचे वाचन करण्याची किल्ली सापडेल अशी आशा व्यक्त केली आहे. आपल्या नवीन वाचन पद्धतीच्या साह्याने आपण सिंधु उत्खननात मिळालेल्या सिंधुलेखांचे वाचन करू. त्यात आपणास पूर्ण वाक्ये










मिळाली आहेत त्यावरून सिंधुलोकांच्या भाषेबद्दल आणि लिपीबद्दल आपणास यथार्थ ज्ञान होईल. सिंधु लिपीवरचा गूढवादाचा लोखंडी पडदा दूर होईल. निरर्थक असलेली सिंधु अक्षरे व चिन्हगुंफणी अर्थपूर्ण होऊन बोलू लागतील. भारताच्या प्रथम संस्कृतीचे यथार्थतया दर्शन घडेल. भारतातील प्रादेशिक भाषा संस्कृत भाषा, दाक्षिणात्य भाषा कशा निर्माण झाल्या व वाढल्या हे सम्यक्तया पाहता येईल. त्यांच्या निर्मिती व वाढीबद्दल यथार्थ ज्ञान मिळेल व त्या संबंधी भारतात आणि इतरत्र असलेले अपसमज दूर होतील.

तसेच भारतातील व भारता बाहेरील ब्राह्मी, देवनागरी, रोमन व परशिअन, ह्या जगातील चार अत्यंत प्रमुख लिपींची उत्पत्ती भारतातील सहा हजार वर्षापूर्वी असलेल्या सिंधुलिपीत आहे हे पाहून लिपीच्या उत्पत्तीबद्दल भारतात आणि इतरत्र असलेले अपसमज दूर होतील.

अज्ञात लिपी वाचणारांना भाषेच्या साहाय्या-शिवाय अज्ञात लिपीतील लेख कसे वाचावे याबद्दलच्या नवीन पद्धतीचे ज्ञान होईल.

प्रस्तुत लेखकाचे Indus civilisation Rig-veda and Hindu Culture' हे अंदाजे ७५० पृष्ठांचे इंग्रजी पुस्तक प्रकाशनाच्या वाटेवर आहे. त्या पुस्तकात सिंधुलिपी आणि सिंधुमुद्रांच्या वाचना-बद्दल दोन अत्यंत महत्वाचे परिच्छेद जोडले आहेत. त्यात सिंधुलिपी वाचण्याची नवीन पद्धति महत्वाच्या काही सिंधुमुद्रांचे वाचन व सिंधु उत्खननात सापड-लेल्या अन्य लेखाचे वाचन केले आहे. त्या योगे भारतीय भाषा आणि लिपी बद्दलच्या कल्पनात अत्यंत क्रांतिकारक बदल घडून येण्याची शक्यता आहे. संपूर्ण सिंधुमुद्रांचे व लेखांचे वाचन करण्यासाठी वेगळा ग्रंथ लिहिण्याचा विचार आहे.

तत्पूर्वी ह्या महत्वाच्या संशोधनाची माहिती इतरास होण्यापूर्वी ती मराठी वाचकांना व्हावी अशी इच्छा आहे. मुद्रांचे अथवा सिंधु लेखांचे वाचन देण्यासाठी शब्दांचे व समग्र वाचनाचे ब्लॉक करण्याची आवश्य-कता आहे व ते काम काहीसे खर्चाचे व त्रासाचे आहे. तशी व्यवस्था होण्याची शक्यता असल्यास प्रथम सिंधुलिपीचे व नंतर सिंधुमुद्रांचे वाचन दोन वेगळ्या लेखात देण्याची इच्छा आहे.

---










ले. डॉ. नगेन्द्र अनु० प्रा. प्यारेलाल गोहेल

# हिंदीचे संशोधन–विषयक प्रश्न

हिंदीतील संशोधनाचा पहिला प्रश्न म्हणजे संशोधन–कर्त्यांच्या संख्येचा होय. काही दिवसापूर्वी दक्षिणेतील एक विद्वान आमच्या विद्यापीठात आले होते. त्यांनी मोठ्या उत्साहाने आपल्या भाषा–वाङ्मयाच्या विकासाच्या प्रगतिविषयी माहिती सांगितली. बरेच ऐकून घेतल्यानंतर मी त्यांना विचारले की तुमच्या साहित्यात सर्व विद्यापीठातून एकूण किती विद्यार्थी एम. ए. च्या परीक्षेस बसतात आणि संशोधन करणाऱ्यांची संख्या किती असते ? त्यांनी उत्तर दिले 'साधारणपणे ३०-४०विद्यार्थी एम. ए. ला बसतात व संशोधनासाठी प्रवृत्त झालेल्यांची संख्या जवळपास ८-१० असते.' त्यांनी तोच प्रश्न विचारल्यानंतर मी म्हटले आपला विश्वास असल्यास तुमच्या संख्येला ५० नी गुणा म्हणजे झाले. ही वाढती संख्या अभिमानास्पद नसली तरी चिंतेचे कारण मात्र नाही. परंतु या प्रश्नाचे साधारणपणे उत्तर देणेही आवश्यक आहे– नित्य नवीन विषयांची संख्या तर अधिक नसणार. माझ्या मते संशोधनाचा विषय म्हणजे असा विषय ज्याच्या कक्षेत नवीन तथ्यांचा नि तत्वांचा शोध घेण्यास पूर्ण वाव असून पुनरावृत्तीचा दोष न येता परिणामात ज्ञान–वृद्धी करणारा असेल. दुसरा प्रश्न मार्गदर्शकांचा– निरीक्षकांचा. एवढे मार्गदर्शक कोठून आणावयाचे. संशोधन करणाऱ्याची संख्या ज्या गतीने वाढत आहे तिची भरपाई करण्याची साधने पुरेशी नाहीत. वाढत्या बेकारीने तर या परिस्थितीला अधिकच दयाजन बनविले आहे. आजकाल अनेक अपरिचित भटकणाऱ्या व्यक्ती मोठ्या संख्येने माझ्याकडे येतात. तुम्हाला आश्चर्य वाटेल की, त्यातील जवळ जवळ ३३ टक्के नोकरीसाठी आणि ६७ टक्के संशोधनाच्या कार्यासाठी येतात. जर माझ्यासारख्या साधारण माणसाची ही स्थिती तर लब्धप्रतिष्ठित विद्वानांजवळ येणाऱ्यांच्या दयाजनक स्थितीची कल्पना केलेली बरी. जनसंख्येच्या वृद्धीचे नियंत्रण जसे आवश्यक तसे संशोधन-कर्त्यांच्या संख्येचे नियंत्रण करणेही आवश्यक आहे. हे नियंत्रण नियोजनाच्या स्वरूपाचे हवे, जबरदस्तीचे नव्हे. संशोधन विषयाच्या संख्येपेक्षा त्यांची संख्या अधिक असता कामा नये. परंतु हिंदी साहित्याचा विस्तारकाल आणि कार्य दोन्ही दृष्टीने इतका मोठा आहे की आम्हाला निराश होण्याचे मुळीच कारण नाही. अजून राजस्थान, व्रज, पंजाब, आणि अवध सारख्या क्षेत्रात इतके विपुल साहित्य अप्रकाशित आहे की शेकडो संशोधकांची शक्ती त्यांत लावण्याची आज गरज आहे. या अभावपूर्तीचा आणखी एक उपाय म्हणजे अंतःसाहित्यिक विषयांचा संग्रह. अंतःसाहित्यिक म्हणजे असे विषय ज्यामध्ये भारताच्या विविध साहित्यात परस्पर वाङ्मयासंबंधी सामुग्री उपलब्ध होऊ शकेल. आमच्या प्राचीन आणि अर्वाचीन वाङ्मयाच्या बऱ्याच प्रवृत्ती अशा आहेत की ज्यांचा विभिन्न भारतीय भाषांत समान विकास झाला आहे. हे साम्य अनेक प्रकारचे आहे. कुठे मूलभूत साम्य आढळून येते तर कुठे विकासशीलतेची समानता दिसते. काही ठिकाणी परस्पर देवाण घेवाण झालेली दिसून येते, ही वैशिष्ट्ये महत्वाची आहेत. सामान्यपणे सत्याचा शोध घेण्यासाठी आणि विशेषत्वाने भारतीय संस्कृति आणि परम्परा तसेच ऐक्य कायम ठेवण्याच्या दृष्टीने या सर्वांचे महत्व आहे. वरील विषयांवर संशोधन सुरू झाल्यास हिंदी–संशोधनाच्या इतिहासात एका नवीन दिशेचा प्रारंभ होईल.

या संदर्भात दुसरा प्रश्न विषयाच्या पुनरावृत्तीचा. हिंदी–संशोधनाच्या क्षेत्रात अशी तक्रार नेहमी ऐकू येते की विभिन्न विद्यापीठात सारख्याच विषयावर संशोधन होत असते. या दोषामुळे शक्तीचा दुरुपयोग तर होतोच शिवाय गुणवत्ताही रहात नाही. या तक्रारीत अर्थ आहे यात शंकाच नाही. उचित मार्गाने त्याचे निराकरण होऊ शकते. अनेक ठिकाणी

एकाच विषयावर संशोधन-कार्य हे दोषपूर्ण नाही हे तर विषयाच्या स्वरूपावर अवलंबून आहे. विषय जर मर्यादित असेल तर त्याची पुनरावृत्ति होईल. तसे नसल्यास व्यापक विषयावर संशोधनास विशाल क्षेत्र असू शकते. मूलभूत तत्वांच्या विविध अंगाचे प्रकाशन ज्ञान–विस्ताराला अधिक उपकारक ठरते. या दृष्टीने संशोधन–कार्य करणाऱ्या संस्थांच्या कार्याला अधिक योजना– बद्ध आणि संघटित करण्याची आवश्यकता आहे. ही संघटना विद्यापीठ पातळीवर किंवा विभागीय पातळीवर करणे अधिक सुलभ जाईल. अशा प्रकारे पुनरावृत्तीचा हा दोष गुण बनेल व एकाच विषयाच्या विविध बाजूंचा खोलवर अभ्यास होऊन विवेचनांत गहनता व सूक्ष्मता येईल. दुसरा प्रश्न मार्गदर्शकांचा. हा प्रश्न खरोखर कठीण असून तोही सोडविणे अशक्य नाही. विद्यापीठांना मार्ग-दर्शनाची व्यवस्था करण्यासाठी आपल्या अधिकारांत संशोधन–वर्ग सुरू करावे लागतील. अशा वर्गात संशोधन--पद्धति ( Methodology ) विषयीं सामूहिक स्वरूपाचे शिक्षण देता येईल. त्याप्रमाणे विद्यापीठ व्यतिरिक्त बाहेरच्या अनेक साहित्य–संस्थांशी तसेच हिंदी व इतर भाषेतील हिंदी-प्रेमी विद्वान साहित्यकारांशी संबंध प्रस्थापित करणे काही मर्यादेपर्यंत लाभदायक ठरेल. असे अनेक साहित्यकार आहेत ज्यांचे हिंदीच्या संशोधन-कार्यात अमूल्य सहकार्य लाभू शकेल. पदवी नसल्यामुळे त्यांच्या सहयोगाशिवाय राहणे आम्हाला श्रेयस्कर ठरणार नाही.

संशोधनाची पातळी राखण्याचाही प्रश्न महत्वाचा आहे. चोहोकडून अशी ओरड ऐकू येते की हिंदी–संशोधनाची पातळी खूप खालावली असून ती उत्तरोत्तर ढासळत आहे. माझ्या मते हा आरोप बरोबर नाही. संख्या-वृद्धिमुळे अगदी ' ए वन माल ' मिळावा ही आशा सुसंगत नाही परंतु म्हणून सर्वच कार्य कुचकामाचे आहे हे म्हणणे अन्यायकारक ठरेल. या आरोपाच्या मुळाशी अनेक कारणे आहेत–विद्या-पीठांतील अयोग्य स्पर्धेची भावना, विद्वानांच्या मनांत उद्भवलेली ईर्षेची भावना, जुन्या पिढीतील विद्वा-नांची अनुदारवृत्ती, हिंदीतर भाषा आणि विषयांच्या विद्वानांचे हिंदी-विषयीं अज्ञान आणि प्रगति विषयीं द्वेष–भाव इ. इ. शांत चित्ताने परिस्थितीचा विचार केल्यास प्रश्नांचे मूळ स्वरूप अधिक स्पष्ट होईल. तक्रार करणारे तरी कोण आहेत ? जुन्या पिढीचा असा विश्वास आहे की योग्यायोग्यतेची कसोटी आम्ही आणि आमच्या सहकाऱ्यांनीच निश्चित केली आहे. नवीन पिढीतर उत्तरोत्तर ऱ्हासाकडेच झुकत आहे. तेव्हा प्रत्येक पहिल्या पिढीचा मॅट्रिक– पास मागील पिढीच्या संशोधन-कर्त्यांच्या दृष्टीने निकृष्टच असणार यात शंका नाही. यासंबंधीं अत्यंत नम्रतेने मी एवढेच सांगू इच्छितो की प्रतिभा आणि विषय-नैपुण्य हा कोण्या एका पिढीचा एकाधिकार असू शकत नाही. दुसरे असे कीं मागील पिढीचे काही प्रबंध आम्हाला मार्गदर्शन करणारे असतीलही परंतु असे प्रबंध देखील आहेत ज्यावर ज्येष्ठांनी मोठ-मोठ्या पदव्या मिळविल्या आहेत परंतु ते प्रबंध प्रकाशित करण्याचे धैर्य मात्र त्यांना झाले नाही. हिंदी भाषा व विषयांचा संबंध नसणाऱ्या विद्वानांची टीका मात्र काहींशा अज्ञान, शंका व द्वेष भावनेने प्रेरित अशी आढळून येते. काहींही असो कार्य आमच्या पुढे आहे. काहींना प्रकाशक प्रयत्न करून मिळत नाही आणि ज्यांचे प्रबंध प्रकाशित झाले त्यांच्या ज्ञानाच्या पातळीला पाहून निराश होण्याचे कारण नाही. शेवटचे कारण स्वाभाविक आहे. अयोग्य स्पर्धेचे प्रमाण कमी होऊ लागले आहे. अनेक विद्या-पीठांच्या हिंदी विभागांतून परस्पर सहकार्याची भावना निर्माण होत आहे. समान ध्येय व अधिकार कर्तव्याचे उचित विभाजन झाल्यास, सहयोगाचे नवे वातावरण लवकरच निर्माण होईल असा मला विश्वास वाटतो. गेल्या १५ वर्षांतील संशोधन कार्याचे अलिप्तपणे निरीक्षण केल्यानंतर माझे असे मन बनले आहे की हिंदीक्षेत्रांतील प्रत्येक विश्व-विद्यालयाने या दृष्टीने नेहमी सहकार्य केले आहे. पुढे कार्य करणाऱ्यांना जर मार्गदर्शन मिळाल्याचा गौरव वाटत असेल तर मागच्या पिढीला विकासाचे श्रेय देणे भाग आहे. परस्पर सहकार्य अधिक हितावह ठरणार आहे. परंतु असे म्हणत असतांना मला असे मुळीच सुचवायचे नाही की आज जे काही आहे ते सर्व समाधानकारक आहे; आणि त्यांत कोणत्याही










प्रकारच्या सुधारणेची आवश्यकता नाही. संशोधनाची पातळी टिकविण्याचा प्रश्न वास्तविक मोठा बिकट आहे. त्यासाठी आवश्यक उपायांची योजना करणे आवश्यक आहे. पहिला उपाय म्हणजे मार्गदर्शकांची व्यवस्था करणे हा होय. संशोधकांच्या संख्येच्या मानाने मार्गदर्शकांची संख्या पुरेशी नाही. त्याचा परिणाम असा होतो की एका मार्गदर्शकाच्या हाताखाली अनेक प्रकारचे संशोधन-कार्य चालू असते. काही ठिकाणी तर मार्गदर्शक आणि विद्यार्थी या दोघांत पाचशे मैलांचे अंतर असते. काही वेळा मार्गदर्शकास प्रबंध वाचण्यास वेळच मिळत नाही; तर काही संशोधन करणारे विद्यार्थी असे समजतात की मार्गदर्शकापेक्षा मलाच अधिक ज्ञान आहे. ही परिस्थिती अत्यंत चिंताजनक असून त्याचा दोष प्राध्यापकांना देता येत नाही. मार्गदर्शकाच्याही काही मर्यादा असतात. बौद्धिक आणि शारीरिक दोन्ही. शारीरिक म्हणजे तो आपले दैनंदिन कार्य सांभाळून ३–४ प्रबंधांचे निरीक्षण करू शकत नाही. आणि बौद्धिक म्हणजे मार्गदर्शक विशेषज्ञ असू शकेल, सर्वज्ञ नव्हे. त्यांना ज्यांत गम्य नसते. अशा अनेक विषयासंबंधी मार्गदर्शन करणे त्यांना भाग पडते. कांही वेळा तर तो संबंधित विषयाशी पूर्णपणे अबोध असतो. एकाच मार्गदर्शकास आल्हखण्ड, कामायनीची भाषा, छायावाद, रीतिकाल आणि कथा-शिल्प सारख्या असंबद्ध विषयांत मार्गदर्शन करावे लागते. काही वेळा मार्गदर्शकाचा फक्त पत्ता मिळविण्यासाठी विद्यार्थ्यास आकाश पाताळ एक करावे लागते. व तो अशा मार्गदर्शकाजवळ जाऊन पडतो की पाहिजे असलेल्या व्यक्तीशी संबंध जोडणे त्यास अशक्य होऊन बसते. अशा परिस्थितींत फार मोठ्या आशा बाळगणे व्यर्थ आहे. माझी अशी सूचना आहे की अशा निरीक्षण-कार्यावर काही बंधन घालणे आवश्यक आहे. तात्त्विक दृष्टीने त्याचे समर्थन होऊ शकत नाही आणि शैक्षणिक दृष्ट्या तसे करणे हितावह तर मुळीच नाही माझ्या मते या बाबतीत फार कठोरपणे वागण्याची आवश्यकता आहे. कठोरपणामुळे काही वेळा न्याय्य घडणार नाही कदाचित् पण अन्याय मात्र होता कामा नये. असे करण्यांत विद्यार्थ्यांचे मुळीच नुकसान नाही. तात्पुरत्या समाधानासाठी अतिसामान्य प्रबंधाला मान्यता देणे म्हणजे विषय व व्यवसायावर अन्याय करण्यासारखे आहे. विद्यार्थ्यांचे त्यांत नुकसान होते हा भाग आणखी निराळाच. संशोधनाकडे गंभीरपणे न पाहता तात्पुरती सारवासारव करण्याची सवय मात्र लागते. परिणाम मात्र दूरगामी नि घातक ठरतात. प्रारंभीच्या वर्ष सहा महिन्यांत अधिक परिश्रम करणे प्रथम विद्यार्थ्याला व नंतर 'शिक्षण-क्षेत्राला' उपकारक ठरणारे असते. आणखी तिसरा उपाय आहे– शास्त्रीय शिक्षण–क्रमाचा प्रारंभ करणे. मी स्वतः त्या दृष्टीने प्रयोग केले असून त्यामुळे माझे समाधान झाले आहे. विद्यार्थ्यांना त्या आवडीनुसार विषय देऊन मार्गदर्शनाची व्यवस्था करून दिली पाहिजे आणि अशी अट घातली पाहिजे की सामुग्री-संकलन आणि कमीतकमी प्रास्ताविक-भूमिका लिहून झाल्यानंतरच विद्यार्थ्याचा नियमानुसार प्रवेश झाला असे समजण्यांत येईल. असे करण्यात दोन फायदे आहेत– पहिला म्हणजे कामाच्या अभावातून इच्छे-अनिच्छेने आलेल्या विद्यार्थ्यांचे संशोधनावरील वेगडी प्रेम नष्ट होईल व अशा अनधिकारी विद्यार्थ्यांचा भरणा कमी झाला म्हणजे मग शिस्तबद्ध कार्य करण्यास सुलभ जाईल. दुसरे म्हणजे खऱ्या संशोधकास आपल्या मर्यादांचे नि शक्ति-सामर्थ्याची निश्चित कल्पना येते आणि संशोधन-पूर्व अभ्यास केल्याने शास्त्रीय पद्धतीचे व विवेचनाचे सम्यक् ज्ञान प्राप्त करून घेण्यास संधि मिळते. त्यांची दृष्टि स्थिर होते आणि 'येन केन प्रकारेण' पदवी प्राप्त करून घेण्याच्या इच्छेचे निराकरण देखील. सारांश, या पद्धतीमुळे विद्यार्थ्यांचे नुकसान न होता त्यांची तीन वर्षे पूर्णपणे संशोधनांच्या कारणी लागतात.

वास्तविक आज संशोधनाकडे पाहण्याचा योग्य दृष्टिकोण लोप पावत आहे. त्यासाठी उपयुक्त वातावरण निर्माण करून शुद्ध, बौद्धिक आणि शैक्षणिक दृष्टिकोणाचा विकास साधणे आवश्यक आहे. भावार्थ असा की संशोधन-पदवीचा संबंध व्यावसायिक उन्नति बरोबर एका विशिष्ट मर्यादेच्या आत असला पाहिजे. विकास-उन्नतीची इच्छा तर असलीच पाहिजे परंतु विकासाची कल्पना केवळ आर्थिक किंवा व्यावसायिक न राहता बौद्धिक आणि आंतरिकही असणे जरूरीचे








आहे. हे कार्य अधिकारी-वर्गाचे आहे. त्यांनी अशी व्यवस्था करावयास हवी की पीएच. डी ने महाविद्यालयातील एल्. टी ची जागा घेऊ नये. असे झाल्यास शिक्षण आणि संशोधन दोन्ही क्षेत्रांचे नुकसान आहे. प्रत्येक चांगला संशोधक उत्तम शिक्षक असेलच असे नाही. काही वेळा तर तो सामान्या पेक्षा निकृष्ट-प्राध्यापक म्हणून सिद्ध होतो. यासाठी दोघांच्या उद्देशांत नि पद्धतीत असलेले सूक्ष्म अंतर स्पष्ट झाले पाहिजे. संशोधन-पदवीचा संबंध शिक्षण क्षेत्रापुरता मर्यादित करण्यांत आल्याचे परिणाम अत्यंत घातक होऊ शकतात; होत आहेत. त्यासाठी स्वतंत्र व्यवस्था हवी, स्वतंत्र प्रतिष्ठान हवे ज्या ठिकाणी संशोधकाच्या प्रतिभेचा आणि कार्याचा योग्य उपयोग केला जाईल. असे झाल्यास संशोधनाची पातळी उंचावेल.

संशोधनाची-पातळी कायम राखण्यासंबंधीचीही एक समस्या आहे– ती म्हणजे पीएच. डी आणि डी. लिट्च्या सापेक्ष मूल्यांकनाची. आतापावेतो या बाबतीतील गोंधळच आढळून येतो. प्रारंभी केवळ एक डी. लिट् पदवी होती नंतर मग पीएच. डी आणि डी. लिट् या दोन पदव्या निघाल्या. कुठे एक तर कुठे दोन्ही ( तारतम्य पाहून ) चालू आहेत. हे स्पष्ट आहे की उत्तर प्रदेशांत बऱ्याच विद्यापीठांत पीएच. डी ही पहिली पदवी डी. लिट् ही अत्यंत उच्च पदवी त्या नंतरची. माझ्या मते दोन्ही पदव्या मधील हे अंतर स्पष्ट समजून सर्वत्र समान लागू करण्याची व्यवस्था झाली पाहिजे. ज्या विद्यापीठांत ही व्यवस्था नाही तेथे देखील शिक्षण–क्रमांतील समानता राखण्याच्या दृष्टीने ती स्वीकारली गेली पाहिजे. ही पद्धती स्वीकारल्यानंतर मग संशोधन–कार्याच्या मार्गदर्शकांचा निरीक्षकांचा देखील क्रम–भेद स्पष्ट झाला पाहिजे. डी. लिट् साठी परीक्षकांची, मार्गदर्शकांची जरूरी नाही. तो असलाच पाहिजे असे नाही. जो डी. लिट् साठी इतरांच्या मार्गदर्शनाची अपेक्षा करील त्याने दुसरे काम शोधावे हेच बरे. मूल्यांकन करण्याविषयींदेखील आमच्या मनांत शंकेस जागा नको. पीएच. डी. पेक्षा डी. लिट् चा संशोधन–प्रबंध विषय, विस्तार विवेचन-गांभीर्य व प्रतिपादनपूर्णता इत्यादि सर्व दृष्टींनी श्रेष्ठ असला पाहिजे आणि याच आधारावर त्याचे मूल्यांकन होणे आवश्यक आहे. डी. लिट् चा प्रबंध म्हणजे केवळ संशोधन–ग्रंथ क्रमांक दुसरा नव्हे तर तो एक श्रेष्ठ गंभीर संशोधन ग्रंथ होय. अशा ग्रंथांवर काही मतप्रदर्शन करण्या आधी परीक्षकास विषयाशी परिचित होणे आवश्यक आहे. तेव्हाच दोघांतील क्रम–भेदाचे रक्षण होऊन दोघांचे अंतर सार्थक होईल.

आतापर्यंत मी एक व्यावसायिक प्राध्यापक आणि मार्गदर्शक या नात्याने प्रश्नांच्या व्यावहारिक बाजूंचे विवेचन केले. वाङ्मयीन बाजूविषयीं नंतर करीन.

---










प्रा. सौ. उषा जोशी

# एकांकिकेचा विकास आणि विजय तेंडूलकर

[ उस्मानिया विद्यापीठाच्या मराठी स्वाध्याय– संशोधन मंडळापुढे सादर करण्यात आलेला निबंध ]

एकांकिका या वाङ्मयप्रकाराची, कलाप्रकाराची वाढ मराठी साहित्यात केव्हा व कशी झाली याचा इतिहास मोठा उद्बोधक आहे. एरवीच साहित्यक्षेत्रात जे जे नवे वाङ्मयप्रकार आकार घेतात त्यांची प्रक्रिया लक्षणीय असते. मराठीत आधुनिक काळात एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात विविध वाङ्मयप्रकारांचा विकास समांतर झाला असला तरी त्यातही भिन्नत्व आढळते; विकासाच्या प्रेरणाही सगळ्याच प्रकारांच्या बाबतीत सारख्या नाहीत. पाश्चात्यांचे थोडे अनुकरण, विविध चळवळीमुळे व परिस्थितीच्या दडपणामुळे झालेली जागृती, त्याचबरोबर प्रतिभावान माणसे, त्यांची आत्माविष्काराची धडपड, परिस्थितीची गरज या सर्वांतून हे वाङ्मयप्रकार वाढले, फोफावले वास्तविक कथा कादंबरी, नाट्य, कविता, निबंध याचे अंकुर इ. स. १८७० पर्यंत होतेच; पण अनेक प्रेरणांचा समन्वय घडताच ते बाळसेदार झाले, जोमाने वाढले; तसेच त्यांच्या दिशाही एकसारख्या राहिल्या नाहीत. निबंधवाङ्मय लोकशिक्षणाच्या आधारे समृद्ध झाले. कथा, कादंबऱ्या मनोरंजनाच्या माध्यमातून पुढे आल्या, तर नाट्य मनोरंजन व विविध कलांच्या सामूहिक समन्वयातून प्रगट झाले. परिस्थितीचे दडपणही सर्वच वाङ्मयप्रकारावर सारखे नव्हते. सामाजिक अभिरुची, प्रतिभावंतांची क्षमता व समाजाचा प्रतिसाद या अनुरोधाने या प्रकारांची वाटचाल आढळते. कवितेत आत्मप्रगटीकरणाचीच प्रेरणा बलवत्तर झालेली दिसते तर नाट्यवाङ्मयाच्या बाबतीत लोकरंजनाबरोबरच सामाजिक समस्यांचा विचार व प्रचार, राजकीय तसेच तात्त्विक प्रश्न, त्याबरोबरच स्थलकालविरहित मानवी प्रेरणांचे उद्घाटन यावर भर आढळतो. सर्वच वाङ्मयप्रकारामागील यच्चयावत् प्रेरणा, त्यांचा विकास व तदनुषंगिक प्रश्नांचे विवेचन मी करीत नाही व ते इथे अपेक्षितही नाही. पण एकाच काळात व एकाच समाजात या वाङ्मयप्रकारात जी पृथगात्मता आढळते ती मराठी साहित्याला खचित भूषणावह होय. या सर्व विवेचनाचा उद्देश हा की, कुठलाही वाङ्मयप्रकार जेव्हा मूळ धरतो तेव्हा त्याच्या मागे कार्यकारणपरंपरा असते व अभ्यासासाठी त्याची नोंद आवश्यक ठरते.

एकांकिका या वाङ्मयप्रकाराची पाहणी, चर्चा करताना काही महत्त्वाच्या गोष्टी दृष्टोत्पत्तीस येतात. मराठीतील नाट्यनिर्मितीवर पाश्चात्यांप्रमाणे प्राचीन संस्कृत साहित्याचाही प्रभाव पडला. पाश्चात्यांचा प्रभाव विषय, तंत्र या दृष्टीने खूप गडद असला तरी तो प्रभावच होता. सरळसरळ सरसकट अनुकरण नव्हते. जर ते निव्वळ अनुकरणच असते तर यच्चयावत् गोष्टीचे असते हे एक व काही कालानंतर ते वाङ्मय निष्प्रभ ठरले असते किंवा अस्तंगत झाले असते. आधुनिक मराठी नाट्यवाङ्मयक्षेत्रात तर ते घडलेले नाहीच पण इतरही विविध वाङ्मयप्रकार अस्तंगतही झाले नाहीत किंवा पाश्चात्यांच्या पुरत्या अनुकरणात गुंतले नाहीत. इंग्रजी वाङ्मयक्षेत्रात लोकप्रिय असलेले One act play व Short Essay हे दोन्ही प्रकार त्यावेळी आमच्या लेखकांनी उचललेच नाहीत. संस्कृतमध्ये भासाची नाटके उपलब्ध होती पण त्याचेही अनुकरण झाले नाही. जुन्या फार्ससारख्या कलाप्रकारात कदाचित् एकांकिका बीजरूपाने असण्याचा संभव असेल. संक्षेप, बांधीवपणा असे काही गुण त्यात होते असे वाङ्मयेतिहासकार सांगतात.[१] पण

१. प्रा. बनहट्टी म. रं. इ. खंड १ ला पृ. १७५ विष्णुदास प्रणीत पौराणिक नाटकात संघटित कथानक आणि कलात्मक एकात्मता यांचा बहुतांशी अभावच असे. ओबडधोबड व प्राथमिक स्वरूपात का होईना पण फार्सात या गोष्टी होत्या. ...... सुसंघटित नाट्यकला आणि सध्याच्या समाजजीवनास अनुसरून असलेले चित्र वठविण्याची प्रवृत्ती या दोन फार महत्त्वाच्या गोष्टी या फार्समुळे मराठी रंगभूमीमध्ये रुजू झाल्या हे लक्षात ठेवले पाहिजे.






अनुक्रमणिका



त्यांची परंपराही वाढली नाही व आज ती नाटकेही उपलब्ध नाहीत. त्यामुळे त्यांचा विचार करता येण्यासारखा नाही. तंजावर येथेही नाट्यकला विकसित झाली. तेथे कदाचित् हा वाङ्मयप्रकार असला तरी तेथील साक्षात् वारसा या रंगभूमीने घेतला नाही. कै. हरिभाऊ आपटे यांनी काही नाटिका, एकांकिका लिहिल्या. कै. राम गणेश गडकरी यांनीही 'सकाळचा अभ्यास' सारखी संक्षिप्त नाट्यरचना केली. पण त्यांचेही कोणी अनुकरण केल्याचे नाट्येतिहासावरून दिसत नाही. मला असे वाटते की वाङ्मयप्रकार हा इतर कुठल्याही प्रेरणांपेक्षा लेखकाच्या त्या पद्धतीने लिहिण्याच्या आवश्यकतेतून निर्माण होतो. इ. स. १९३५ पर्यंतच्या मराठी नाट्यसृष्टीतील प्रतिभावंतांना पाच अंकी, तीन अंकी नाट्यरचनेतून विहार करावासा वाटला. प्रेक्षकांनाही भरगच्च, ठसठशीत प्रयोग यांचे आकर्षण होते; अभिरुची त्याला अनुकूल होती. अशा परिस्थितीत एकांकिका निर्माण होण्याला भूमी अनुकूल नव्हती असेच म्हणणे क्रमप्राप्त आहे.

इ. स. १९४० नंतरचा नाट्यकलेचा इतिहास मात्र भिन्न आहे. किर्लोस्करानंतर सतत ५०–६० वर्षे तृप्त झालेल्या मराठी रसिकतेने काही नवे मागणे चूक नव्हते. पण दीर्घकाळ एकाच चाकोरीतून वाढलेल्या कलावंतांकडून ही अपेक्षा पूर्ण होणारी नव्हती. कै. मामा वरेरकरांसारख्यांनी काळाची गती ओळखून खूप खटपट केली. पण त्यांना उपलब्ध साधनेही जुनीच होती. याच काळात निबंधाच्या पोटातून लघुनिबंध बाहेर येत होता. भरीसभर म्हणून सिनेमाचे नवे आकर्षण उपलब्ध झाले. परिणामी नाटकमंडळ्या कोसळल्या. रुचिपालट, नवीनाचे आकर्षण, जुन्यांची असमर्थता, वास्तववादाचा वाढता प्रभाव या सर्वांचा तो अपरिहार्य परिपाक होता. जे अटळ होते तेच घडले असे आज म्हणावे लागेल. इ. स. १९४० नंतर याही स्थितीतून मराठी नाट्यकला कशी बाहेर पडली हे पाहण्यासारखे आहे. प्रदीर्घ नाटके, झुलीसारखे वाटणारे संगीत प्रेक्षकांनीच नाकारले होते. तेव्हा त्यातला विवेक ओळखूनच नव्या नाट्यचळवळी निर्माण झाल्या. या नाट्यमन्वंतराच्या प्रवर्तनात अत्रे, रांगणेकर, भोळे, वर्तक इ. अनेक नाटककार दिसतात. या सर्वांच्या धडपडीची महत्त्वाची प्रेरणा ही रंगभूमीचे अस्तित्व टिकविण्याची होती. त्याचबरोबर नाट्यांतर्गत अनेक प्रयोग करण्याची, नवीन समस्यांची दखल घेऊन रचना करण्याची होती. नवीन सामाजिक समस्या श्री. रांगणेकरांनी 'कुलवधू'त मांडली. 'सरलादेवी', 'खडाष्टक', 'साष्टांग नमस्कार' ही नाटके बदललेल्या स्थितीची व स्वतःचे अस्तित्व नव्याने सिद्ध करू पाहणाऱ्या धडपडीची द्योतक होती. एकांकिकेचा जन्म झाला तो या परिस्थितीत. रंगभूमीच्या पुनरुज्जीवनात तिचे बीज दिसते. इ. स. १९४४ मध्ये 'कडकलक्ष्मी' नावाची एकांकिका वरेरकरांनी प्रसिद्ध केली. तिच्या प्रस्तावनेत त्यांनी सरळ नोंदवूनच ठेवले आहे की, अलीकडेच तीनचार वर्षात या एकांकिका लोकप्रिय झाल्या. डिसेंबर १९४१ मध्ये प्रसिद्ध झालेल्या अनंत काणेकरांच्या 'धूर व इतर एकांकिका' या संग्रहाच्या प्रस्तावनेत हेच विचार मांडले आहेत. श्री. रांगणेकरांच्या 'फरारी' नाटिकेच्या प्रस्तावनेत अशाच आशयाचा उल्लेख आहे. रंगभूमीच्या पुनरुज्जीवनाचे हे तीन साक्षीदार. वाङ्मयप्रकाराचा जन्म जरी गरजेपोटी झाला असला तरी लेखकाला तो वाङ्मयप्रकार आविष्कारासाठी अपरिहार्य वाटला पाहिजे. कुठलाही जीवनानुभव जेव्हा विशिष्ट माध्यमातून आविष्कृत होतो, तसा साकार होण्यासाठी प्रचलित पद्धतीच्या मर्यादा जाणवल्यानंतरच ती कोंडी फोडून नवा प्रकार रूढ होतो. पण ती प्रक्रिया नेहमीच जाणीवपूर्वक होत नाही; बव्हंशी सहज व साधारणरूपात घडते. एकांकिका हा वाङ्मयप्रकार जन्माला आला खरा पण त्याची अपरिहार्यता, आवश्यकता ही आरंभकाळी काही अपवाद सोडले तर जाणवत नाही. मागणीनुसार झटपट लिहून देण्यासाठी, करण्यासाठी, कमी वेळात एखादी समस्या सुलभतेने सांगण्यासाठी, सभासंमेलन प्रसंगी नाटकाची छोटी आवृत्ती म्हणून एकांकिकेकडे पाहिले गेले. केवळ याच कारणामुळे नाटिका-एकांकिका हे दोन्ही प्रकार सरसकट सारखेच मानले गेले. इ. स. १९४५ नंतर काही थोड्याथोडक्या नाटिका-एकांकिका लिहिल्या गेल्या नाहीत; पण प्रकार सर्वत्र एकच. नाटिका ही संक्षिप्त आवृत्ती, कमी काळात होणारी कृती. तिला समांतर संज्ञा म्हणजे एकांकिका. प्रथितयश तसेच प्रयत्नपूर्वक ज्यांची नावे आठवावी लागतील अशा अनेक लेखकांनी हे प्रकार हाताळले.










पण त्यांनी ना कुणी समीक्षकांनीही त्याची चिकित्सा केली नाही. त्यातले अंतर स्पष्ट केले नाही. पण यातूनच पुढच्या काळातील एकांकिकांचा पाया घातला गेला असे मानण्यास हरकत नाही.

नाटिका, एकांकिका यांच्या रचनेत जो सार्वत्रिक स्थूलपणा इ. स. १९५५ पर्यंत दिसतो त्याकडे अजून एका दृष्टीने पाहिले तर नाट्यकलांतर्गत विरोध दिसतो व वरील विचाराला पुष्टी मिळते इ. स. १९४० नंतरचे जे नाट्यवाङ्मय आपणासमोर आहे, त्यात धडपड असली तरी सूक्ष्मताही आहे. खुद्द रांगणेकरांचे ' कुलवधू ' पु. ल. देशपांडे यांचे ' तुझे आहे तुजपाशी, ' वि. वा. शिरवाडकरांचे ' दुसरा पेशवा ' ' कौंतेय ' ही व यासारखी अन्य उदाहरणे सांगितली जाऊ शकतील. याच समर्थ लेखकांनी ज्या नाटिका, एकांकिका लिहिल्या त्या सरळसरळ घटना-प्रधान, प्रसंगप्रधान, हास्यरसप्रधान हे कोडेच वाटते. प्रतिभेचे सामर्थ्य असलेल्या या नाटककारांनी या छोट्या वाङ्मयप्रकाराकडे पुरेशा गांभीर्याने पाहिलेच नाही. याशिवाय याचा दुसरा अन्वयार्थच लागत नाही. शिरवाडकर, कणेकर; रांगणेकर यांच्या या एकांकिका आहेत हे वाचताना विसरावे लागते. समर्थ आशय मांडण्यासाठी त्यांना हा कलाप्रकार राबवावासा वाटला नाही. पण समर्थ आशय व बांधेसूदपणा नसेल तर कलेचा स्पर्श होणे नाही हे रसिकांना वेगळे सांगायला नको. वाङ्मयप्रकार वाढत असताना तो नेहमीच स्थूलातून सूक्ष्माकडे जातो. ही क्रिया कधी मंद तर कधी वेगाने घडते. पण लेखकांच्या सामर्थ्यापेक्षाही त्यांना त्या वाङ्मयप्रकारा-विषयी वाटणाऱ्या आत्मीय-तेवर ती निर्भर आहे. फडके, खांडेकर यांच्यासारख्या मातबर लेखकांनी हेतुपूर्वक लघुनिबंध जोपासला; पण एकांकिकेच्या बाबतीत तिचे अंतर्गत सामर्थ्य ओळखून तिचा दर्जा वाढायला माझ्या मते १९५६ साल उजाडावे लागले.

वरेरकरांनी आधी पण एकांकिका लिहिल्या पण त्यांच्या ज्या चांगल्या एकांकिका आहेत त्या इ. स. १९५६ नंतरच्या हे विसरता येत नाही. या स्थित्यंतराचे मानकरी माझ्या मते श्री. पु. व्यं. दार-व्हेकर, पु. ल. देशपांडे, वसंत सबनीस, रत्नाकर मतकरी, कै. पद्माकर डावरे हे होत. या कला-प्रकाराचा उपयोग आपल्या अभिव्यक्तीसाठी केला तो या लेखकांनी. काटेकोरपणाने सांगायचेच झाले तर हे स्थित्यंतर दारव्हेकरांच्या 'कल्पनेचा खेळ व इतर एकां-किका' आणि पु. ल. देशपांडे यांच्या ' मोठे मासे व छोटे मासे ' या संग्रहापासून झाले असे म्हणावे लागेल. लेखकांच्या प्रतिभेप्रमाणे नभोवाणीलाही या श्रेयाचा वाटा द्यावा लागेल. कारण याच काळात नभोवाणी-वरून एकांकिका प्रसृत करण्याचा प्रघात वाढला. नभो-वाणीचे तंत्र ध्वनीवर आधारित असल्यामुळे व स्वरूप केवळ श्राव्य त्यामुळे केवळ घटनाप्रधान, प्रसंगप्रधान लिहिण्याचे टाळणे अपरिहार्य ठरले. या काळात एकां-किका बाळसेदार झाली, लोकप्रिय झाली पण ती अभ्यासाचा भाग मात्र झाली नाही.

या स्थित्यंतरानंतर ज्या एकांकिका लिहिल्या गेल्या त्यात आपणास सूक्ष्म नाट्याचे अनेक गुण दिस-तात. वसंत सबनीस, पद्माकर डावरे यासारखे लेखक उपहास, उपरोध यांचे साहाय्य घेऊन, जीवनातील अनेक व्यंगे दाखवितात. ' घरमालक', ' प्रेक्षकांनी क्षमा करावी, ' ' कुटुंब गावाला जाते ' ' कुटुंब आजारी पडते ' यासारख्या वसंत सबनीसांच्या एकांकिका केवळ रंजनप्रधान नाहीत. तीच गोष्ट पद्माकर डावरे यांच्या ' दादा ! भाई !! नवरोजी !!! ' मामा फडणवीस ' ' बदाम राणी चौकट गुलाम ' यासारख्या एकांकि-कांची हेतुप्राधान्य तर त्यात आहेच; पण चांगल्या एकांकिकांना आवश्यक असणारे अनेक गुण त्यात आप-णास आढळतात. भाववृत्तीची तरल एकात्मता, व्यक्ती-च्या आशा, आकांक्षा हे रत्नाकर मतकरींच्या एकांकि-केचे विशेष म्हणावे लागतील. त्यांच्या ' लाट फुटली,' ' शर्वरी ' या एकांकिका ह्या दृष्टीने उल्लेखनीय आहेत. पु. ल. देशपांडे यांच्या 'सारं कसं शांत शांत या एकां-किकेतून विनोदाच्या आधारे तरुण मनाची अगतिक-ताच व्यक्त होते. दारव्हेकरांच्या एकांकिका तर सरसच आहेत. अक्रोडाचे झाड, ' पऱ्यांचा महाल ' यातल्या उत्कट भावना, जीवनानुभव, नाट्य मुळातूनच पहावे लागेल. या लेखकांच्या लेखनात एक दिशा आहे. हेतु-पूर्णता आहे. एखादी कल्पना फुलवून परिणामकारक करण्याचे कौशल्य आहे, जीवनातील सूक्ष्म नाट्य हेरण्याचे कसब आहे. यामुळेच ही एकांकिका केवळ










घटनाप्रधान, सामाजिक संघर्षापासून वेगळी आहे. नेमकी याच ठिकाणी एकांकिका नाटकाची छोटी आवृत्ती नसते, नाटिकेची प्रतिकृती नसते. मराठी एकांकिकेचे सर्व सामर्थ्य प्रगट करण्याऱ्या विजय तेंडुलकरांच्या एकांकिका या दृष्टीने पाहणे मनोरंजक होईल. पण त्यांच्या एकांकिकांचे विवेचन करण्यापूर्वी आजच्या मराठी एकांकिकेची मला दिसलेली व्यवच्छेदक लक्षणे देणे इष्ट ठरेल :

(१) कमीतकमी पात्रे, प्रसंग, हालचाली, शब्द, यांच्या मित उपयोगातून निर्माण होणारा आकृतिबंध.

(२) एखादी भावना, कल्पना वा विचार हा त्याच्या अंगोपांगांसह न मांडता सूक्ष्मपणे त्यातील नाट्य व उत्कटता व्यक्त करणारी कलाकृती.

(३) ही उत्कटता साधण्यासाठी वापरले गेलेले तंत्र हे नाटकाच्याप्रमाणे विस्तारत, रंगत अनेक पातळीवरून चढत जाणारे नसते तर उलट आशयाच्या अंतरंगात वाचक, प्रेक्षकांना एकदम घेऊन जाते.

(४) विनोद व हास्यरस एकांकिकेला वर्ज्य नाही, नसावा पण त्याला जोपर्यंत आशयप्राधान्य मिळत नाही तोपर्यंत ती कलाकृती ठरणार नाही.

( ५ ) एकांकिका ही अक्षरशः एकांक असली पाहिजे. दृश्ये बदलल्याने ती अनेक प्रवेशी ठरेल व नाट्याचा विस्तार करील. नाट्याला सूचकता, संघटितपणा, उत्कटता ही अपरिहार्य आहेत.

( ६ ) कल्पना, भावनाप्राधान्य असल्यामुळे व्यक्तिदर्शन, परिपूर्ण स्वभावरेखन एकांकिकेत अपेक्षित नाही. येथे ती नाटक नाटिकेपेक्षा वेगळी ठरते.

( ७ ) ती कालसापेक्ष असते. ४० ते ४५ मिनिटे यापेक्षा तिचा प्रयोग लांब नसावा.

एकांकिकेसंबंधी माझी ही धारणा आहे. इ. स. १९५६ हे जे मी स्थित्यंतराचे वर्ष मानले. त्या पूर्वीच्या काळातील एकांकिकांतून ती मूल्ये अभावानेच जाणवतात. पुनरुक्तीचा दोष पत्करूनही एक उदाहरण देता येईल ते वि. वा. शिरवाडकरांच्या एकांकिकेचे. १९४९ साली ‘ दिवाणी दावा,’ ‘ गरीब माणसं ’ या एकांकिका प्रसिद्ध झाल्या. त्याच काळातली प्रतिभेचा स्पर्श असलेली ‘दुसरा पेशवा’, ‘कौंतेय’, ‘वैजयंती’ ही नाटके पाहिल्यावर या एकांकिका अगदीच सामान्य वाटतात. कदाचित् या एकांकिका कुठल्यातरी सभा-समारंभासाठी लिहिल्या गेल्या असतीलही. पण एकांकिकेचे लक्षणीय विशेष त्यात आढळत नाहीत ही गोष्ट खरी. त्यावेळच्या एकांकिकांतून कमीअधिक प्रमाणात हेच सर्वत्र दिसते. मात्र १९५६ नंतरची एकांकिका ही खरीखुरी एकांकिका वाटते. त्यातही तिच्या सर्व गुणांचा चांगला समन्वय आपणास आढळतो तो विजय तेंडुलकरांच्या एकांकिकांत.

तेंडुलकरांच्या एकांकिका तशा जास्त नाहीत. अवघ्या बारा पंधरा. त्यांच्या मुलांसाठी असलेल्या एकांकिका मी वगळल्या आहेत. तेंडुलकरांच्या या एकांकिकांत त्यांच्या कलागुणांचा तर आपणास परिचय होतोच पण त्या आजच्या एकांकिकांचा अत्युच्च मानदंड आहेत असे म्हटल्यास ती अतिशयोक्ती होऊ नये. त्यांच्या एकांकिकांच्या विवेचनातून जास्तीत जास्त कलामूल्ये स्पष्ट होतात. तेंडुलकर हे नाटककार म्हणून अधिक विख्यात आहेत. पण त्यांच्या नाटकातील गुण व संघर्ष यांचे स्वरूप निराळे आहे व एकांकिकांतील कलागुण निराळे आहेत. इथे साक्ष पटते ती फक्त एकाच गोष्टीची, दोन्हीमागे असणाऱ्या एका जीवनदृष्टीची. एरवी त्यांच्या एकांकिकांतील अनुभवविश्व हे एकांकिकांतूनच यशस्वीपणे प्रकट व्हावे अशाच स्वरूपाचे आहे. तेंडुलकरांच्या नाटकांवरून जाणवते ते म्हणजे हा मराठीतील प्रयोगशील व धडपडणारा नाटककार आहे. जीवनाकडे पहायचे ते मुळी कसलीही ढापणे डोळ्यांवर न बांधता; कोठल्याही ठरीव मूल्यांचा आग्रह न धरता. समाजातील व्यक्तीव्यक्तीतील संघर्ष त्यांनी रंगविले ते त्यातूनच. त्यांची महत्त्वाची नाटके चार. ‘ मधल्या भिंती ’; ‘ चिमणींचं घर होतं मेणाचं ’, ‘ माणूस नावाचे बेट ’ ‘ मी जिंकलो मी हरलो ’ या चारही नाटकातील संघर्ष वेगवेगळे आहेत. ‘ मधल्या भिंतीत ’ कौटुंबिक आघात-प्रत्याघाताचे चित्रण जिवंतपणे त्यांनी केले. ‘ चिमणींचं घर होतं मेणाचं ’ यात त्यांनी माणसाच्या सुखदुःखविषयक कल्पनेलाच हात घातला. ‘ माणूस नावाचे बेट ’ मध्ये संवेदनशील, सत्त्वस्थ पण चिरफाळलेल्या मनाची स्थिती दाखविली तर ‘ मी जिंकलो मी हरलो ’ यात कलावंताची तडफड व्यक्त केली. या नाटकांचे यशापयश किती हा वेगळ्या चिकित्सेचा विषय. पण या सर्व नाटकांच्या मागे एक








दृष्टी प्रामुख्याने दिसते की हा कलावंत जीवन जास्तीत-जास्त समजून घेण्याचा प्रयत्न करतो. जीवनाकडे त्याच्या अंगोपांगांसह सहानुभूतीने पाहतो. स्वतःची मूल्ये ठरवून त्यानुसार जीवन बेतीत बसण्यापेक्षा जीवनातील सत्त्व शोधण्याची निर्मळ दृष्टी त्याच्याजवळ आहे. किंबहुना जग हीच मुळी या कलावंताच्या लेखी एक प्रयोगशाळा आहे. माणसे येतात, जातात, हसतात, रडतात, पडतात, पुन्हा उठतात. दुःखाची भयानकता एवढी की तिच्यातून सर्वतुच्छवाद निर्माण व्हावा. पण कणव असल्यामुळे हा धोका टळला आहे. नाटककाराची ही प्रकृती अर्थातच एकांकिकेवर प्रकाश टाकणारी नाही. नाटकातल्या संघर्षाला सामाजिक अधिष्ठान आहे. वैचारिकता आहे, भावनांची गुंतागुंत आहे. त्यांची वीण अनेकपदरी आहे तेव्हा ते गुण निराळेच. एकांकिकेतून दिसते ते सूक्ष्म नाट्य, अतिसूक्ष्म नाट्य हे नाट्य नाटकाचा विषय होऊ शकलेच नसते. ह्या सूक्ष्म नाट्याचा अनुभव व्यक्त करण्यासाठी लेखकानी एकांकिकेचा मार्ग पत्करला असावा. हे वेगळेपण तेंडुलकरात विशेषत्वाने जाणवते. मला वाटते मराठी एकांकिकेचे हे यश फार मोठे आहे.

त्यांच्या एकांकिकेचे विशेष स्पष्ट करण्यासाठी काही उदाहरणे आपण घेऊ. ' गोष्ट ' ही एक त्यांची एकांकिका. कमीतकमी पात्रे, मोजके व अर्थगर्भ संवाद आणि हालचाली यांच्या मेळातून त्यानी एका स्त्रीच्या मनातील भावनांचा डोंब दाखविला आहे. उत्तरेचा भाऊ अशोक याने ' सगुणेच्या गोष्टीचा ' आग्रह करणे, पुनरुक्ती करणे ती मूडमध्ये असतानाच तिची मैत्रीण येणे, तिचा परिचित, नित्य येणारा मित्र व अचानक उमटलेला उमदा तरुण यांच्यातून तिच्या मनातील कढणारे भावविश्व तेंडुलकर तर उभे करतातच पण त्याचे जे प्रगटीकरण करतात ते महत्त्वाचे आहे. अत्यंत सूचक, अर्थाची वलये निर्माण करणारे शब्द-प्रयोग या एकांकिकेत आपणास दिसतात. पूर्ण एकांकिकेचा हेतु अर्थातच त्या स्त्रीच्या मनातील भावना वासनाचा क्षोभ. पण तो कल्लोळ उठवितो तो आपल्या मनात. मी सूक्ष्म नाट्य म्हणून वारंवार ज्याचा उल्लेख केला ते हेच होय. येथे भावना एकच असली तरी तिचे सूक्ष्म पदरही आपणास पारदर्शकपणे पाहता येतात. नाट्याचा जो अनुभव म्हणून म्हटला जातो त्याचे हे स्वरूप. त्याशिवाय एकांकिकेसाठी आवश्यक असणारा आकृतिबंध येथे आहेच नव्हे तो आपोआप येतोच.

विजय तेंडुलकरांच्या एकांकिकेचा दुसरा महत्त्वाचा विशेष म्हणजे आकृतिबंध. अनुभवाची उत्कटता, सखोलता, त्याचे अंतर्गत सामर्थ्य यावरून एकांकिकेचा संक्षेप वा विस्तार होतो. त्यात निष्कारण अधिक असे काही आढळणार नाही, व त्रुटितही काही नाही. ह्या सर्व गोष्टी जेव्हा एकत्रितपणे साध्य होतात तेव्हा त्यास आपण यशस्वी आकृतिबंध म्हणू शकू. याचा आणखी एक विशेष म्हणजे हा आकृतिबंध दोन पातळ्यावरून व्यक्त होतो. एक गोचर व दुसरी अगोचर. पण अगोचर स्तर हादेखील वाचकांच्या कल्पनेवर सोडलेला नसतो तर शब्दरचनाच अशी असते की त्यांतून तो आपणास जाणवावा. तो जाणवल्यावरच पुढील भागाचे आकलन शक्य होते. तेंडुलकरांची ' बेबी ' नावाची एकांकिका आहे. दोन मध्यम वयाच्या स्त्रीपुरुषातील वासनात्मक संबंधाचा अनुभव हा या एकांकिकेचा विषय. स्थळ—समुद्रकिनाऱ्यावरील हॉटेल. खिडकीतून दिसणारा फेसाळ समुद्र. टेबलाच्या एका बाजूस पुरुष व दुसऱ्या बाजूस स्त्री बसलेली. घटना-प्राधान्य नसल्याने नावाची जरूरच नाही. ' तो ' 'ती' ने काम भागते. हा पुरुष खादाड, आसक्त. त्याच्या हाल-चाली, भाषा आसक्तीने बरबटलेली. पण हा गडदपणा शब्दात विस्ताराने वर्णिलेला नाही; तरी तो अगोचर भाग आपणास जाणवतोच. टेबलासमोरची स्त्री प्रारंभापासून शेवटपर्यंत विमनस्क आहे पण दगडा-सारखी स्तब्ध नव्हे ती बोलत नाही फक्त Yes किंवा No म्हणते पण हे yes, no च खूप सांगून जाते. ' तो ' च्या दीर्घ अभिप्रायानंतर ती हुंकारत राहते. मधून मधून मागेपुढे पाहते, त्यातही सूचकता असते. यांचे हे वाचिक, आंगिक, आहार्य संभाषण चालू असताना लेखकाने बाजूलाच मनसोक्त हसणारे, खिदळ-णारे जोडपे मुद्दाम दाखविले आहे. त्या माणसाच्या तोंडचे संवाद आहेत ते सूक्ष्म घृणा निर्माण व्हावी इतपतच आहेत. तो माणूस स्वच्छंदी नाही, बेदर-कारही नाही तरी त्याच्या आसक्तीत उबडेपणा आहे. क्वचित् ती पशुत्वाला स्पर्श करणारी आहे आणि तरी








तिला एक निरागसपणाची किनार लेखकाने दाखविली आहे. एक बालक त्या ठिकाणी येते, खेळते व जाते यावरून ती सूचित केली आहे. वासनात्मकतेचे अलिप्तपणे चित्रण हा या एकांकिकेचा मनावर उमटणारा ठसा. संयमाबद्दल वेगळे लिहिण्याची आवश्यकताच नाही; तो तर अंगभूत आहेच. या एकांकिकेत 'गोष्ट' प्रमाणे संघर्षमय प्रक्षुब्ध नाट्य नाही, तर प्रामुख्याने अनुभव आहे. त्या स्त्रीच्या हालचालीत तीव्र नापसंती नसती तर नाट्य आले नसते, त्या अर्थाने सूक्ष्म नाट्यही आहे. अशी ही एकांकिका म्हणजे एक पूर्ण आकृतिबंध दिसतो.

तेंडुलकरांचा तिसरा विशेष म्हणजे अनुभवाची विविधता. सृजनशील कलावंताकडून त्याचप्रमाणे वाङ्मयप्रकारातून ती अपेक्षित असते. ज्या क्षणी सृजनशीलता संपते तेथे आवर्त निर्माण होते. त्यात सापडल्यावर लेखकाची कला व वाङ्मयप्रकार यांचा क्षय झाला तर नवल नाही. तेंडुलकरांचे वेगळेपण जाणवते ते इथे. वासनेच्या अनुभवाचा एक भाग आपण 'बेबी' ह्या एकांकिकेत पाहिला. त्याच वासनेचे अत्यंत व्यावहारिक पातळीवरील चित्रण त्यांच्या 'अजगर आणि गंधर्व' ह्या एकांकिकेत दिसते. 'चार दिवस' ह्या एकांकिकेत तेंडुलकर हास्याच्या व बावळटपणाच्या आड दडलेले सामान्यांच्या जीवनातील कारुण्य व अगतिकता दाखवितात तर 'मादी' ह्या एकांकिकेत तरुण स्त्रीपुरुषांची ओढ, व्यावहारिक ताण, परस्परांची फसवणूक व मुळातीलच त्यांच्या व्यक्तिरवातील खुजेपण व्यक्त करतात. 'ओळख' या एकांकिकेत अनामिक व अनाकलनीय अशा प्रेमाचा अनुभव ते दाखवितात तर 'बळी' या एकांकिकेत माणसे स्वतःच्याच भावनांची 'बळी' कशी ठरतात हे सांगतात. 'समोरचा नाडकर्णी' या एकांकिकेत मध्यमवर्गीय कारकुनी जीवनाचे सुखदुःख, त्यातील हळवेपण आहे तर 'आप्पा बंड करतात' या एकांकिकेत एक दुबळा जीव आपल्याविरुद्ध परिस्थितीत कुचंबतो, एवढेच नव्हे तर जन्मभर जीवनाचा भाग झालेल्या विचारांचा गुलाम बनलेला असतो. सतत अस्वस्थ असूनही तो स्वतःविरुद्ध इतरांविरुद्ध बंड करू शकत नाही. एखाद्या क्षणी तसा तो प्रयत्न करतो. त्या प्रयत्नात स्वतःच्या स्वप्नांची पूर्तता झाल्याचे लटके समाधान तो मिळवितो, पण हा उसना आवेशही फार काळ टिकत नाही. तो लवकरच भुईसपाट होतो; हे फार सुरेख रेखाटले आहे. 'खलित्यांचे युद्ध' म्हणजे मानवी स्वभावाचे एक वैशिष्ट्य दाखविणारी हास्यरसप्रधान एकांकिका. 'झपूर्झा' सारख्या एकांकिकेत विविध दृश्ये दाखवून वाचकांनाच त्यातील सूत्र शोधायला ते प्रवृत्त करतात. या सर्व एकांकिकांतून आपणाला जाणवते ती अनुभवाची विविधता. त्यात पुनरावृत्ती नाही. त्यातील अनुभवांची पातळी वेगळी आहे हे खरे. जेव्हा आपण अनुभव व त्याचे प्रगटीकरण हे महत्त्वाचे कलामूल्य मानतो त्यावेळी विषय, संवाद, घटना यांना गौणत्व येते. म्हणूनच तेंडुलकरांसारख्यांच्या एकांकिकांचा आशय किंवा समकालीन अशा दारव्हेकर, मतकरी, डावरे यांच्या एकांकिकांचे सारांश सांगता येत नाहीत, त्यांचा परिचय करून देता येतो. इ. स. १९५६ नंतरच्या एकांकिकांतून कथानकाला प्राधान्य न देता अनुभवाच्या प्रगटीकरणाची प्रवृत्ती आपणास सध्याच्या अवस्थेत तरी तेंडुलकरांपर्यंत उत्कर्षाला गेलेली आढळते.

अनुभवांचे वैविध्य, वेगळेपण व त्यांचे बंध, त्यातील सूक्ष्म नाट्य याबरोबरच तेंडुलकरांच्या प्रायोगिकतेचा उल्लेख केला पाहिजे. प्रायोगिकता याचा अर्थ माझ्यापुढे तरी काही नवीन करण्याचा प्रयत्न असा आहे. रंगमंचावरील प्रयोगक्षमतेपेक्षा ही प्रायोगिकता भिन्न आहे. प्रायोगिकतेचा अंश नसताही प्रयोगक्षम व परिणामकारक अशा अनेक एकांकिका दाखविता येतील. प्रायोगिकता ही त्या माध्यमाशी निगडित असते. तसेच त्यातील आशयाशी संबंधित असते. तिचे प्रामाणिक प्रगटनच तिचा स्वतःचा मार्ग ठरविते. ही प्रायोगिकता मुद्दाम आणलेली असते अशातला भाग नाही. उलट ही प्रायोगिकता नसेल तर वाङ्मयाचा विकासच थांबेल. या प्रायोगिकतेचे प्रमाण किती व कसे हे लेखकाच्या प्रतिभेवरच अवलंबून असणार. या दृष्टीने तेंडुलकरांची 'झपूर्झा' ही एकांकिका मराठी एकांकिकांतच वेगळी आहे. मुंबईच्या लोकलगाडीच्या प्रवासात वेगवेगळे व्यक्तिसमूह आपापसात बोलत असतात. प्रत्येकाचे सुख वेगळे, दुःख वेगळे, अपेक्षा वेगळी, अगतिकता निराळी; रस वेगळे, छंद वेगळे. एक म्हातारा








दुःखाच्या वेदनेने वाकला आहे तरी तो भविष्यासाठी धडपडतो आहे. कर्जमुक्त मरणे हे त्याचे ध्येय. औषधाची बाटली उशाशी कवटाळणे हे प्रतीक तेंडुलकरांनी त्याच्यासाठी वापरले आहे. गाडी वेगात आहे. ही माणसे गाडीवर हिंदकळतात, दैवावरही हिंदकळतात. भूतकाळ क्षणभर निसटल्यासारखा वाटतो तर वर्तमान अस्पष्ट असतो. शेवटी यातून एक परिणाम, एक चित्र तेंडुलकर उभे करतात ते जीवनाच्या अभ्यंतराचे. एकांकिकेत रूढ अर्थाने पात्रे नाहीत तरी संवाद आहेत. रूढ अर्थाने दृश्ये नाहीत तरी खंडित भाग आहेत. या सगळ्यांच्या परस्पर गुंफणीतून, मेळातून जीवनाची ओढ, कातरता सगळे सगळे तेंडुलकर व्यक्त करतात. मी यालाच प्रायोगिकता म्हणते. 'समोरचा नाडकर्णी' यात वेगळाच भाग आहे. थोडी खट्याळ, उपरोधिक, तुलनेने हलकीफुलकी अशी ही एकांकिका यातील एक पात्र प्रेक्षकांशी संवाद करते. (वसंत सबनीस यांचीही पात्रे प्रेक्षकांशी संवाद करतात) हा काही तेंडुलकरांचा एकमेव विशेष नाही. पण त्यानी रंगभूमीवर उभा फ्लॅट घालून दोन भाग केलेले दिसतात. एकांकिकेची सगळी रचनाच मुळी प्रयोगाधिष्ठित आहे. 'काळोख' ही अशीच एक वैशिष्ट्यपूर्ण एकांकिका; संपूर्ण अंधाऱ्या खोलीत घडलेली. रंगमंचावर प्रयोग केलाच तर अंधारच ठेवावा लागेल व केवळ ध्वनीच्या साहाय्यानेच परिणाम साधला जाईल. मला सांगायचे ते असे की तेंडुलकरांचे हे जे प्रयोग आहेत ते अभिव्यक्तीसाठी आलेले असून अपरिहार्यपणे आलेले आहेत; अनुभवाशी अंगभूत आहेत— कर्णाच्या कवचकुंडलासारखे. म्हणूनच त्यात जसे सामर्थ्य तसे सौंदर्यही आहे.

विजय तेंडुलकर यांच्या अवघ्या १५-२० एकांकिकांच्या आधारे मांडलेले हे विवेचन. त्यांचेही लेखन अद्याप थांबले नाही व मराठी एकांकिकांची निर्मितीही थांबली नाही. नभोवाणीच्या माध्यमाचा आधार मिळाल्यामुळे या कलाप्रकाराला सारखा बहरच येत आहे. असंख्य नवे नवे लेखक त्यात भर टाकीत आहेत. त्यांना प्रसिद्धीही मिळते आहे; पण दुर्दैवाने त्यांचे प्रयोग मात्र तेवढ्या विपुलतेने होताना आढळत नाहीत. एकांकिकेचा एखाददुसरा प्रयोग झाल्यानंतर ती अलगद दप्तरदाखल होताना आढळते. लेखकाइतकेच अभिनेते, दिग्दर्शक व रसिक यांच्या सतत प्रेमाचे जीवन एकांकिकेला मिळत राहिले तर मराठी एकांकिकेचे भवितव्य आज तरी आशादायक आहे.

---












प्रा. शांताराम वामन कुळकर्णी

# " अनगड मोती " – एक अभ्यास

कै. न. वि. गाडगीळ यांनी राजकारण व अर्थशास्त्र या व्यतिरिक्त जे विविध प्रकारचे लेखन केले आहे त्यातील काही आत्मपर, काही अध्यात्मपर तर काही प्रवासवर्णनपर असे आहे. काही प्रसिद्ध मराठी नियतकालिकातून व दिवाळी अंकातून त्यांचे जे विविध ललित लेख प्रसिद्ध झाले आहेत त्या स्फुट लेखांचे 'अनगड मोती,' 'सालगुदस्त,' 'स्मृतिशेष,' 'माझा येळकोट' इ. संग्रह ग्रंथरूपानेही प्रसिद्ध झाले आहेत. हे ललितलेखन करून गाडगिळांनी राजकारणाप्रमाणे मराठी साहित्यातही आपल्या कर्तृत्वाचा ठसा उमटविला आहे.

" अनगड मोती " हा गाडगिळांच्या १६ लेखांचा संग्रह आहे. या संग्रहातील लेखांचा अभ्यास करतांना प्रथम कोणता विचार मनात येत असेल तर तो त्यांच्या वाङ्मयप्रकारासंबंधीचा ! हे लेख विचारप्रवर्तक निबंधात्मक आहेत, पण ते टिळक-आगरकरीपद्धतीचे गंभीर निबंध नाहीत. त्यात लालित्य, आत्मनिष्ठा आहे, तरीही त्यांना फडके-खांडेकरी पद्धतीच्या तथाकथित लघुनिबंधाच्या प्रकारात बसविता येणार नाही. डॉ. इरावती कर्व्यांच्या 'परिपूर्ती'तील लेखांप्रमाणे 'अनगड मोती'तील लेखांना लघुनिबंध म्हणता येणार नाही. 'लघुनिबंध' या वाङ्मयप्रकाराचा एक निश्चित असा साचा ठरलेला आहे. सर्वमान्य झालेला आहे. सौंदर्यदर्शन हा लघुनिबंधाचा प्रमुख हेतू असून त्याचे स्वरूप जिवलग मित्राशी केलेल्या गुजगोष्टींसारखे असते. चमत्कृती, काव्यमय कल्पनाविलास व जीवनाकडे पाहण्याचा गमतीदार, खेळकर, काहीसा विनोदी दृष्टिकोन हे त्याचे प्रमुख घटक असतात. " लघुनिबंध म्हणजे वायुलहरीच नाहीत तर काय ? त्या कोठून येतात आणि कोठे जातात याची कल्पना नाही. त्यांचा स्पर्श अंगाला गोड लागतो. त्याजबरोबर वाहत येणारा सुविचारांचा व सुंदर कल्पनांचा सुगंध मनाला क्षणभर आल्हाद देतो. त्यांचा खेळकरपणा मनाला मोहून टाकतो ! लघुनिबंध म्हणजे गोड कुजबूज ! ! " मराठी साहित्यातील आजचे नामवंत सहृदय टीकाकार प्रा. वा. ल. कुळकर्णी यांनी वरील विधानांतून लघुनिबंधाचे मंत्र तंत्र, त्याचे प्राण, त्याची प्रकृती, त्याचा गाभाच जणू शब्दरूप केलेला आहे. प्रमाणबद्धता, आटोपशीरपणा, रेखीव व कलात्मक मांडणी हे लघुनिबंधाचे रचनाविशेष होत. या सर्व ल. नि. च्या निकषांवर जर आपण " अनगड मोती " या संग्रहातील लेखांची प्रकृती व आत्मा तपासून पाहू लागलो तर आपणास स्पष्टपणे आणि निःसंदिग्धपणे जाणवते ते हेच की हे लेख लालित्यपूर्ण आत्मनिष्ठ असूनही त्यांची प्रकृती ल. नि. ची नाही. ल. नि. च्या विशेषांचा या लेखात अभाव आहे. याचे प्रमुख कारण गाडगिळांची जीवनाकडे, जीवनातील वैयक्तिक व सामाजिक अनुभवांकडे घटनाप्रसंगांकडे पाहण्याची भूमिकाच मुळात वेगळी आहे. आणि ल. नि. लेखकापेक्षा ती निश्चितपणे वेगळी आहे. जीवनाकडे, जीवनातील घटनाप्रसंगांकडे पाहण्याची गाडगिळांची खास स्वतःची स्वतंत्र वैशिष्ट्यपूर्ण अशी एक वेगळीच भूमिका असून या संग्रहातील प्रत्येक लेखाच्या मुळाशी ती सहजपणे जाणवते. गाडगीळ हे एक मुत्सद्दी व मुरब्बी राजकारणी असल्यामुळे त्यांचे व्यक्तिमत्त्व अष्टपैलू व ढंगदार झालेले आहे. राजकारणात दीर्घ काळ घालवल्यामुळे मानवी जीवनातील, मनातील विसंगती, मानवी स्वभावाचे, मनाचे सूक्ष्म व सखोल ज्ञान त्यांना आहे. राजकारणातील अनेक अनुभवांमुळे त्यांचे व्यक्तिमत्त्व संपन्न व समृद्ध झाले आहे. यामुळेच त्यांच्या या लेखांची प्रकृती ल. नि. पेक्षा वेगळी झालेली आहे. प्रा. मं. वि. राजाध्यक्ष यांनीही, " या लिखाणाला अमुक एका ललितवाङ्मयप्रकाराच्या कक्षेत बसविता येईल असे सांगता येत नाही. मात्र त्यात लालित्य आहे, प्रसाद आहे. थोडीशी कथावस्तू आहे. जे लिहिले ते सत्यावर










अनुभव जसा आला त्याप्रमाणे लिहिले आहे " असे उद्गार काढले आहेत त्याचेही कारण हेच आहे, "सर्व वाङ्मयीन साच्यांपासून अलिप्त असलेला ललित निबंध गाडगीळ लीलेने लिहितात." हे श्री. खांडेकरांचे विधानही हेच सूचित करते. तात्पर्य, गाडगिळांच्या या लेखांना ललितनिबंध वा ललित लेख म्हणणेच यथार्थ ठरेल! तथाकथित लघुनिबंध प्रकाराच्या मालिकेत त्यांना बसविता येणार नाही.

जीवनाकडे, जीवनातील अनुभवांकडे, लहानमोठ्या कोणत्याही घटनाप्रसंगांकडे पाहण्याची गाडगिळांची खास स्वतःची अशी एक पद्धती आहे. भूमिका आहे, असे जे मी वर विधान केले आहे त्याचे स्पष्टीकरण असे. त्यांच्या या भूमिकेचे पहिले वैशिष्ट्य हे की या अनुभवातील, घटनाप्रसंगातील सुखदुःखाबद्दल गाडगिळांना खंतखेदविधिनिषेध नसतो. नफ्यातोट्याच्या हिशेबी वृत्तीने ते त्यांच्याकडे पाहात नाहीत. तसेच त्या अनुभवाकडे केवळ एक पृथक् अनुभव, स्वतंत्र अनुभव वा घटनाप्रसंग या दृष्टीने ते त्याकडे पहात नाहीत, ते त्याचे दुसरे वैशिष्ट्य, संपूर्ण मानवी जीवनाच्या पटावर, त्याच्या पार्श्वभूमीवर ते तो अनुभव वा घटनाप्रसंग टिपून घेतात. आपल्या संपूर्ण जीवनाच्या अनुषंगातून ते तो अनुभव वा घटनाप्रसंग उपभोगतात. उपभोगतात असे म्हणण्याचे कारण असे की ते त्या त्या अनुभवाशी, घटनाप्रसंगाशी, संपूर्णपणे समरस होतात. एकजीव होतात; आणि त्याचा जिवंत आस्वाद घेतात. आणि म्हणूनच त्या अनुभवातून घटनाप्रसंगातून त्यांना मानवी जीवनाला, व्यक्तिमत्त्वाला समृद्ध व संपन्न करणाऱ्या काही अत्यंत मौलिक सत्यांचा, शाश्वत चिरंतन तत्त्वांचा साक्षात्कार होतो. यामुळे अनुभव कितीही साधासामान्य व नित्याचा असला तरी त्यांच्या व्यक्तिमत्त्वावर एखादा ठसा वा संस्कार उमटवून जातो. हा ठसा कायमचा असतो, तसाच मौलिकही असतो. गाडगिळांना त्यातून चिरंतन शाश्वत सत्याचा वा तत्त्वाचा प्रत्यय येतो याचे कारण त्या त्या प्रसंगाकडे अनुभवाकडे पाहण्याची, तो जगण्याची, उपभोगण्याची, त्यांची खास वेगळी अशी वृत्ती हेच होय. कोणत्याही अनुभवाशी, घटनाप्रसंगाशी गाडगीळ तादात्म्य पावतात. त्यांत रंगून जातात. आणि अगदी जिवंतपणाने, मोठ्या साक्षेपाने त्या अनुभवाच्या आत्म्याचा तळ ते शोधू लागतात. अशा रीतीने अनुभवाच्या खोल तळाशी बुडी मारल्यामुळे मानवी मनाचे, मानवी जीवनाचे, त्यासंबंधीच्या तत्त्वज्ञानाचे काही अमोल मोती त्यांच्या हाती अचूकपणे लागतात; आणि त्यांच्यावर स्वतःचे कुठलेही पैलू न पाडता. कृत्रिम संस्कार त्यावर न करता, ते ते मोती तसेच 'अनघड' स्वरूपात वाचकांच्या हाती सुपूर्त करतात. तेच हे "अनगड मोती"! जितके मौल्यवान, तितकेच अनगड असूनही सहजसुंदर!!

"हिमालयाच्या अयशस्वी प्रवासाची" फलश्रुती म्हणजे त्यांना लाभलेली 'पळपुटे बाजीराव' ही पदवी! पण त्याचा विधिनिषेध न बाळगता त्या अनुभवातून त्यांना मोती सापडले ते हेच की या चढाईत व परताईत आलेले प्रत्यक्ष अनुभव हे त्यांचे पुढील आयुष्यातील उपयोगी भांडवल ठरते. इनामदारांची घोडी म्हणजे साक्षात् साहसाचे, धाडसाचे कर्तृत्वाचे आव्हान! त्या घोडीवर स्वार होण्याच्या प्रसंगाचे रसभरित वर्णन एवढेच त्या अनुभवाचे महत्त्व नाही. तर कोणत्याही कार्याच्या, योजनेच्या सुरवातीचा क्षण ओळखणे, आणि अखेरचाही क्षण ओळखणे, त्याचे मर्म हस्तगत करणे हाच यशस्वी जीवनाचा मूलमंत्र आहे! रहस्य आहे! या जीवनातील एका अत्यंत मौलिक व महत्त्वाच्या तत्त्वाचा साक्षात्कार त्या अनुभवातून त्यांना घडला. हेच त्यांचे जीवितकार्य होय! प्रचलित मार्गाला सोडून चालल्याबद्दल रागावलेले, यशामुळे आनंदितच होतात हा राजकारणात, समाजजीवनात अत्यावश्यक असलेला विश्वास त्या प्रसंगातून त्यांच्या ठिकाणी निर्माण झाला हेच त्या अनुभवाचे सार्थक होय! नवस फेडण्याच्या प्रसंगातून त्यांना ज्या एका महत्त्वाच्या मौलिक सत्याचा साक्षात्कार झाला तो हाच की शेवटी मनुष्य हा विरोधांचा संचय आहे. तो एकीकडे आस्तिक असतो तसाच तो दुसरीकडे नास्तिकही असतो. पण ही विसंगती हेच तर त्याचे वैशिष्ट्य आहे! 'सुसंगती हा गाढवाचा गुण आहे' हेच खरे! अगदी प्रामाणिकपणे आत्मपरीक्षण केले तर नास्तिक असल्याची प्रौढी कुणीही मारू नये. भारताची प्राचीन संस्कृती आस्तिक्यवादी असून हजारो वर्षांच्या संस्कृतीच्या पाशातून सर्वस्वी कोणी सुटू शकत नाही हेच चिरंतन सत्य होय! गाडगिळांना त्या त्या घटनाप्रसंगातून, अनुभवातून










अशा सुंदर चिरंतन तत्त्वांचा साक्षात्कार होतो याचे कारण ते त्यात रंगून जातात. जिवंत मनाने तो अनुभव ते आस्वादतात. उपभोगतात. कारण कोणत्याही अनुभवाच्या तळाशी गेल्याशिवाय त्यातील शाश्वत सुंदर तत्त्वांचे मोती हे हस्तगत होणार नाहीत. होत नाहीत हीच त्यांची महत्त्वाची भूमिका आहे. त्या त्या अनुभवाकडे, घटनाप्रसंगाकडे पाहण्याचे गाडगिळीपद्धतीचे तंत्र मंत्र ते हेच ! हेच त्यांचे स्वतंत्र वैशिष्ट्य होय. ' गोध्याच्या पवालो'तून गाडगीळ केवळ चहाच पीत नाहीत; तर त्यातील चहाबरोबरच त्या प्रसंगातून त्यांना स्वतःच्या व्यवहारदक्षतेचा, व्यवहारचातुर्याचा आत्मविश्वासही प्रतीत होतो. आणि त्याच भांडवलावर ३३ वर्षे ते राजकारणात, समाजकारणात अधिकारवाणीने वावरतात. या पवालोच्या अनुभवाच्या जोरावर आत्मविश्वासाची मांड थाटून त्यांचा अहंकार राजकारण, समाजकारण व वैयक्तिक जीवन यात कर्तृत्वाची झेप घेतो. एका प्रसंगी "त्या भ्रमाचा फुगा " फुटतो, आत्मविश्वासाची हवा निघून जाते आणि मग कर्तृत्वाच्या इमारतीचा पायाच ढासळून पडतो. पायाखालची वाळूच सरकू लागते. व्यवहारदक्षतेचा तो पुरावा व्यवहारशून्यतेचे गमक ठरतो ... ... पण त्यातून चिरंतन तत्त्वाचा लाभ होतो तो हाच की कुणास ठाऊक ! कितीतरी मानवी सिद्धांत असेच फसवे नसतील, भ्रामक नसतील कशावरून ? मानवाने कोणत्याच सिद्धांताबद्दल फाजील विश्वास बाळगू नये हेच खरे ! वाक्चातुर्य, मानवी स्वभावाचे सूक्ष्म ज्ञान आणि संयमशील वृत्ती यामुळे, स्वतःच्या नव्यानेच घेतलेल्या स्लिपरच्या आनंदतंद्रीत रस्त्यातून जात असताना अनवधानाने एका तरुण तगड्या पहिलवानाच्या पायावर त्यांचा पाय पडून मोठा अनवस्था नाट्यमय प्रसंग निर्माण झाला असताही त्यातून ते सहीसलामत सुटतात. त्या नाट्यपूर्ण प्रसंगातून त्यांना मौलिक तत्त्वाचा प्रत्यय येतो. ते तत्त्व म्हणजे "सद्विचारांचा नैतिक सरंजाम माणसाला अनेक संकटातून सोडवतो. विकारवश होण्याच्या क्षणी विवेकदीप मालवला असताना मनुष्य संभ्रमात सापडतो. आणि सामान्यपणे विवक्षित असलेले मार्गच त्याला दिसतात. तथापि प्रचलिताच्या पलीकडे परंपरेहून दूर पण स्थायी संस्कृतीला अनुसरून असणारा असा आणखी एक ' मार्ग ' असतो तो मार्ग विवेकाने शोधावा लागतो. " अशा मौलिक तत्त्वांचा अर्क वाचकांच्या हाती लागताच त्यांचे मन आल्हादित होते. त्या तत्त्वांमुळे वाचकांचेही व्यक्तिमत्त्व संपन्न व समृद्ध होते. पण हा झाला गाडगिळांच्या या लेखांकडे पाहण्याचा बौद्धिक दृष्टिकोन. बौद्धिक आनंदाचा प्रत्यय वाचकाला या लेखांतून येतो. त्याची मीमांसा अशी आहे. या लेखांतून वाचकांना केवळ बौद्धिक आनंदाचाच प्रत्यय येतो असे मात्र नाही. या विचारसौंदर्याबरोबरच वाङ्मयीन सौंदर्याचाही प्रत्यय वाचकांना आणून देणे हे त्या लेखांचे आणखी एक महत्त्वाचे कार्य आहे. विचारसौंदर्य आणि वाङ्मयीन सौंदर्य यांचा मनोहर संगम या लेखात झालेला आहे. आल्डस हक्स्ले या पाश्चात्य लेखकाच्या ' Music at Night ' या सारखा निबंध संग्रह वाचत असताना डॉ. इरावती कर्वे यांचा ' परिपूर्ति 'सारखा निबंधसंग्रह वाचत असताना जो बौद्धिक व वाङ्मयीय आनंद वाचकांना होतो तसाच दुहेरी आनंद ' अनगड मोती ' या संग्रहातील निबंध वाचत असतांनाही होतो. वाङ्मयीन सौंदर्याचा प्रत्यय आणून देणारे या लेखांचे प्रमुख घटक कोणते ते आता पाहू या.

हे ' मोती ' जितके अमोल तितकेच सहजसुंदर आहेत असे मी वर जे विधान केले आहे त्याचे स्पष्टीकरण असे. शैलीचे सौंदर्य हा एक महत्वाचा या लेखाचा घटक आहे. गाडगिळांची लेखनशैली सहजसुंदर अकृत्रिम आहे. एखादा अनुभव गाडगीळ जसा जिवंत मनाने आस्वादतात तसाच, सहजसुंदर पण रसभरित वर्णनशैलीने तो अनुभव, ती घटना वा प्रसंग ते वाचकांच्या मनासमोर साकार करतात, सजीव करतात. या लेखांतील गाडगिळांनी प्रतिपादिलेले अनुभव जसे साधे असूनही नाट्यपूर्ण आहेत, तशीच त्यांची शैली सहजसुंदर असूनही लालित्यपूर्ण, रसाळ, दृक्प्रत्यय आणून देणारी अशी आहे. गाडगिळांची वर्णनशैली कमालीची आत्मनिष्ठ असल्यामुळे, तसेच ते अनुभव त्यांनी प्रत्यक्षपणे घेतलेले असल्यामुळे शब्दाशब्दातून, ओळीओळीतून, क्वचित येणाऱ्या उपमादृष्टांतातून गाडगिळांचे ढंगदार व्यक्तिमत्त्व प्रतिबिंबित झालेले आहे. हेच त्यांच्या शैलीचे महत्वाचे वैशिष्ट्य आहे. वाचक या लेखात रंगून जातो तो प्रथमतः या








लालित्यपूर्ण आत्मनिष्ठ लेखनशैलीमुळेच. खुसखुशीत, खुमासदार, लालित्यपूर्ण व आत्मनिष्ठ शैलीमुळे गाडगिळांनी क्वचित केलेले विषयांतर किंवा तत्कालीन राजकीय तपशील वाचक अगदी सहज खपवून घेतात; नव्हे, त्यातही तितकेच रंगून जातात. गाडगिळांची लेखनशैली जितकी लालित्यपूर्ण, रसभरित आहे तितकीच खुसखुशीत खुमासदार आहे; जितकी प्रवाही व आशयपूर्ण आहे तितकीच उपरोधगर्भ खोचक आहे; जितकी लवचिक व धारदार आहे तितकीच प्रसादपूर्ण व लज्जतदारही आहे. जितकी साधीसरळ आहे तितकीच ठसकेबाजही आहे; जितकी अकृत्रिम व स्वाभाविक आहे तितकीच ऐटदार डौलदार आहे. रुबाबदार आहे. भावप्रवाही असूनही ती खानदानी व अभिजात आहे. सहजसौंदर्याबरोबर अभिजात रमणीयताही तिच्यात आहे. असे असूनही तिच्यात कृत्रिम नखरा नाही, नटवेपणा नाही. तिला अलंकरणाची हौस नाही, नटण्यामुरडण्याची, सौंदर्याचे कृत्रिम प्रदर्शन करण्याचा हव्यास नाही. असे असूनही गाडगिळांच्या व्यक्तिमत्त्वाप्रमाणे ती विविधरंगी व विविधढंगी आहे. मानवी मनांतील सूक्ष्मातिसूक्ष्म भावच्छटा नेमक्या व मोजक्या शब्दांत समर्थपणे समर्पकपणे वाचकांच्या मनासमोर साकार करण्याचे अप्रतिम कौशल्य गाडगिळांच्या लेखनशैलीत आहे. गाडगिळांची तरल कल्पकता, विलक्षण बुद्धिचापल्य, भाषाप्रभुत्व व भाषा वाकवण्याचे कौशल्य, त्यांची मिष्किल खोडकर व खेळकर वृत्ती, मानवी मनाचे सखोल ज्ञान, इत्यादींच्या बुट्ट्यांमुळे तिचे सौंदर्य अधिकच वृद्धिंगत झालेले आहे. गाडगिळांची लेखनशैली, भाषाशैली दृक्प्रत्यय आणून देणारी चित्रमयी अशी असल्यामुळे इनामदारांच्या घोडीवर स्वार होतांनाचे त्यांचे दृश्य आपल्या डोळ्यासमोर तरळू लागते; तर केव्हा केव्हा आगगाडीच्या डब्यांत त्यांच्यावर होत असलेला लुटारूंचा प्राणघातकी हल्ला जणू आपण प्रत्यक्ष अनुभवत आहोत असा भास आपणास होतो. ' ईदका चांद ' मधील म्हाताऱ्याचे ते चित्र जणू गाडगिळांबरोबर आपण स्वतःही पहात आहोत असे क्षणभर आपणास वाटू लागते. तो तो प्रसंग वा घटना वाचकांच्या मनासमोर जिवंतपणे साकार करण्यात गाडगिळांचा हातखंडा आहे. अभिजात संस्कृत वाङ्मयाच्या परिशीलनाने त्यांची शैली सुसंस्कृत, खानदानी झालेली आहे. क्वचित प्रौढ प्रगल्भ झालेली आहे तिच्यात एकप्रकारचा खानदानी रुबाब आलेला आहे. शि. म. परांजप्यांच्या शैलीतील उपरोध, वक्रोक्ती व डौल; माडखोलकरांच्या शैलीतील विदग्धता, रम्य पदन्यास, नर्तनशीलता; व फडके खांडेकरी पद्धतींतील लालित्य, काव्यमयता यांचा अत्यंत रमणीय समन्वय गाडगिळांच्या शैलीत झालेला आहे. किंवा असे म्हणण्यापेक्षा, या सर्वांचा समन्वय साधणारी अशी गाडगिळांची खास स्वतःची स्वतंत्र अशी एक शैलीच आहे. तिला " गाडगिळी शैली " म्हणणेच योग्य ठरेल. ' शैलीकार' माडखोलकरांनंतर मराठीचे शैलीकार गाडगिळांनाच म्हणता येईल. " प्राचीन देशाला सृष्टिनिर्मितीपासून ललामभूत झालेला नगराज हिमालय हे माझ्या प्रवासाचे ध्येय होते," "इनामदारांची घोडी ही तिजसंबंधीच्या कीर्तीमुळे माझ्या तत्कालीन जीवनात एक आवाहन करणारी स्फूर्तिदेवता झाली," अनेक क्रॉस रस्त्यावर पाहिले; क्षणभर वाटले की टाणे पूर्वी स्मशानच होते की काय ?"..."नूतन जावयाचे कौतुक मेव्हाच्या वाट्याला येत होते. "..." मनाच्या सेक्रेटरीएटमध्ये अनुभव, हिकमत, धैर्य यांची बैठक क्षणार्धात भरुन योजना ठरली ... " " थोड्याच वेळात उत्तेजन देणारा, पण उन्माद थांबविणारा, सर्व रोग परिहार करणारा, कवींना स्फूर्ती व वीरांना धैर्य देणारा चहाचा पेला दृष्टिपथात आला " ... " माझ्या शत्रूचे भाग्य असे की अजातशत्रू आहे– फक्त मत्कुण सोडून " ... " खेडी भग्न मनोरथ झालेल्या माणसाप्रमाणे दिसत होती, " " सुखाच्या संवेदना दिलाच्या दिलरुब्यावर गुणगुणू लागल्या, " " झंझावातात कदलीवन उध्वस्त व्हावे तसा शेअरबाजार उध्वस्त झाला, " ... " मन म्हणजे सपिठाच्या पिठाचा गोळा– की ज्याला गृहिणीने काहीही आकार द्यावा, " " जणू काही ( त्या ज्योतिषाने ) अतीत, विद्यमान व भविष्य पंचांगाच्या मिषाने आपल्या कब्जात ठेवले आहेत असे वाटत होते ... ", " टांगा घोडे काढणे म्हणजे माझ्या मानमृगाची हत्या होती. अस्मितेचा परिहास होता, ध्येयाची धुंदी उतरणे होते, " ... इ. इ. असे, त्यांच्या शैलीचे सौंदर्य, उपरोध, मिस्किल छटा, तरल कल्पनाविलास, दाखविणारे अनेक नमुने सादर करता येतील. चहाच्या पोऱ्यापासून तो राजकारणी पुढाऱ्यापर्यंतच्या जगातील विसंगती मोठ्या चातुर्याने ते टिपून








घेतात आणि मार्मिक (पण मर्मभेदक नव्हे) उपरोधिक कोपरखळ्या, चिमटे घेऊन त्यांचे मूळ स्वरूप उघडे नागडे स्वरूप वाचकांसमोर उभे करतात. " हॉटेल मधला चहा म्हणजे आधुनिक कविता– पुष्कळसे शब्द, थोडीशी कल्पना व किंचित अर्थ– पुष्कळ पाणी, थोडा चहा व किंचित दूध. " आधुनिक–नवकवितेवर इतक्या मोजक्या व नेमक्या शब्दात मार्मिक भाष्य याशिवाय मराठी साहित्यात आणखी कोणते असू शकेल ? आणि वैशिष्ट्य असे की गाडगीळ ही शैली सहजलीलया लिहून जातात. हसत हसत मोठ्या मिष्किल वृत्तीने गाडगीळ नाजूक रेशमी चिमटे घेऊन, कोपरखळ्या घेऊन मानवी मनाचे, स्वभावाचे–विशेषतः राजकारणी जगातील व्यक्तींचे दिखाऊ बेगडी नकली मुखवटे बघता बघता खाली उतरवून ठेवतात; आणि वाचकांसमोर त्याचे मूळचे उघडेनागडे स्वरूप उभे राहते, मानवी स्वभावाचे सूक्ष्म सखोल ज्ञान व मार्मिक भाषाशैली यामुळे गाडगिळांना ही किमया सहजसाध्य झाली आहे ... " आणि एवढ्या प्रचंड चुका करण्याचा अधिकार प्रौढपणी नेतृत्व प्राप्त झाल्यावर मिळतो तो मी बालवयात शालेय जीवनातच मिळविला, " ...... " संकटात बुद्धिहत झालेला मनुष्य ज्याप्रमाणे आपल्या पायाला पराक्रमाची संधी देतो तोच इतिहासप्रसिद्ध मार्ग आम्ही चोखाळला– " टकळी फिरविता आली की राजकारण चालविण्याची पात्रता आली, चरख्याचे शास्त्र गीताशास्त्रालाही मागे टाकू लागले ...... बावळट पोशाख व कष्टी मुद्रा ही कार्यकर्त्यांची लक्षणे ठरली. मावळ्यांचे हित बुद्धिबळातील प्यादे ठरले..... " ज्यात धोका आहे असे प्रयोग इतरांकडून प्रथम करवावे ही पुढाऱ्याची जातिवंत बुद्धी ...... " अशा मार्मिक कोपरखळ्या घेऊन, नाजुक अर्थगर्भ चिमटे घेऊन ते कृत्रिम मुखवट्यांचे बेगडी रंग ओरबाडून काढतात. आणि आश्चर्य असे की ही मिष्किल विनोदाची धार इतरांप्रमाणे स्वतःवरही चालवण्यास ते मागे पुढे पाहात नाहीत. कारण प्रामाणिक आत्मदर्शन घडविणे हीच त्यांची वृत्ती आहे. त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील खेळकरपणा, प्रामाणिकपणा तो हाच आहे. प्रामाणिक मनोविश्लेषणाद्वारे स्वतःचे मनही ते वाचकांसमोर ठेवतात. तात्पर्य, त्यांच्या अनुभवांप्रमाणे त्यांची शैलीही खुसखुशीत, नाट्यपूर्ण व चटकदार आणि खुमासदार आहे.

या लेखांच्या वाङ्मयीन सौंदर्याचा दुसरा विशेष म्हणजे त्या त्या अनुभवाची, त्या त्या घटनाप्रसंगांची मांडणी करण्याची त्यांची वैशिष्ट्यपूर्ण पद्धती. गाडगीळ तो तो अनुभव मोठ्या नाट्यात्मक पद्धतीने, प्रतिभासंपन्न कौशल्याने व कलात्मक पद्धतीने वाचकांसमोर ठेवतात. त्यांची ही पद्धती कमालीची नाट्यमय व अत्यंत परिणामकारक आहे, लेखाची सुरुवात एखाद्या खुसखुशीत, चटकदार वा चमत्कृतिपूर्ण अवतरणाने, वाक्याने करून पहिल्या वाक्यांतच ते वाचकांना विश्वासात घेऊन त्यांचे कुतूहलजिज्ञासा जागृत करतात. आणि मग एखाद्या पट्टीच्या गवय्याप्रमाणे गाडगीळ त्या अनुभवांच्या विविध छटांचे रंग खुलवून दाखवीत व वाचकांच्या जिज्ञासेच्या तारेतून मधुर झंकार छेडीत ते मोठ्या ठसक्यात पायरी पायरीने तो अनुभव वाचकांसमोर मांडतात. एखादा पट्टीचा गवय्या जसे सतारीच्या तारेतून लीलेने एखाद्या रागाच्या विविध रागिणी छेडून आपल्या अप्रतिम कौशल्याने रसिकांना मंत्रमुग्ध करून टाकतो तसेच गाडगिळांचेही आहे. गाडगीळ बघता बघता वाचकांना Spell bound करतात. त्यांच्या जिज्ञासेची पकड घेतात. एखाद्या चित्तवेधक नाट्यमय वाक्याने वा उद्गाराने ते लेखाची सुरवात करतात. मग त्या प्रसंगावर मार्मिक भाष्य करतात, आणि मग त्या त्या अनुभवाचा एकेक पैलू ते हळुवार हाताने रमत गमत वाचकांना उलगडून दाखवतात. सूर्यप्रकाश जसा त्रिकोणी काचेच्या तुकड्यातून परावृत्त होताच त्यातून सप्तरंगांचा आकर्षक पट्टा उमटतो; तसेच मूळचा एकच एक अनुभव जेव्हां गाडगिळांच्या अष्टपैलू व ढंगदार व्यक्तिमत्त्वातून परावृत्त होऊ लागतो तेव्हा त्याचे अनेकविध सुंदर, वेधक पैलू पाहून वाचक थक्क होतात. त्या अनुभवाची पार्श्वभूमी त्याचा मध्य व त्याचा शेवट, मोठ्या कौशल्याने, डौलदारपणाने ते करतात. " मी नवस फेडतो ", " ती रात्र ", " बाण्या तेवढा कोट देना, " " पत्रिकेमधी वाहनयोग सांगतो, " " माझा तुला आशीर्वाद आहे, " " काय वर्णू तो सोहळा आता " ! इ. लेखांची सुरवात जशी चित्तवेधक तशीच त्यातील अनुभवांची मांडणी डौलदार व नाट्यपूर्ण आहे. काही वेळा एखादे मार्मिक भाष्य वा विवरण करूनही ते लेखाची सुरवात करतात. पण ते ते








वाक्य बोलणारी व्यक्ति, प्रसंग, संदर्भ यांचे रहस्य कलेकलेने हळूहळू ते प्रकट करीत जातात. क्वचित अगदी शेवटीच त्याचा रहस्यस्फोट करतात. अशी सर्वसाधारणपणे त्या लेखातील अनुभवांची मांडणी आहे. एखाद्या डेरेदार घेरदार घाटदार आम्रवृक्षाचीच उपमा त्यांच्या अनुभवांच्या मांडणीला शोभून दिसेल. कोणताही अनुभव बैठकदारपणे, डौलदार घाटदार पद्धतीने ते मांडतात. त्यांच्या अनुभवांच्या मांडणीतही एक प्रकारचा डौल, ऐट व अभिजात रमणीयता आहे. " ईदका चांद " हा लेख म्हणजे या संग्रहातील, गाडगिळांच्या संपन्न प्रतिभेतून साकार झालेले एक वाङ्मयीन शिल्पच होय ! त्यांच्या अभिजात रसिकतेची साक्ष त्यात पटते, त्यांच्या सहृदय, मर्मग्राही मूलस्पर्शी कलादृष्टीचा प्रत्यय त्यात येतो. त्यांच्या प्रतिभेचे सौंदर्य त्यात पहायला मिळते. या लेखाचा उत्तरार्ध म्हणजे मराठी साहित्यातील रसग्रहणाचा एक अत्युत्कृष्ट नमुनाच म्हणावा लागेल. कोणताही अनुभव कसा जिवंत मनाने ते अनुभवतात याचा उत्तम प्रत्यय " काय वर्णू तो सोहळा आता " या लेखात येतो. अत्यंत परिणामकारक भाषाशैलीने व वर्णनशैलीने त्यांच्यावर अकस्मात ओढवलेल्या मृत्युप्रसंगाचे दृश्य, तो चित्रपट वाचकांच्या मनासमोर गाडगीळ मूर्तिमंतपणे उभा करतात. हा प्रसंग जितका रोमांचकारक, चित्तथरारक आहे तितकाच नाट्यपूर्ण व रहस्यमय आहे. त्याचा ' Suspence ' हा महत्त्वाचा विशेष आहे. या सर्व लेखात ' पत्रिकेमधी वाहनयोग सांगतो ' हा लेख प्रकृतीने लघुनिबंधाला अधिक जवळचा आहे. त्यातून गाडगिळांचे भावकोमल मनोविश्व, बघता बघता भूतकाळात रमून जाणारे त्यांचे भावनाशील, संवेदनाशील कोमल मन. त्यांच्या मनाचा गाभाच आपणासमोर उभा राहतो.

अप्रतीम प्रसंगचित्रण कौशल्य, ललितमधुर आशयपूर्ण वर्णनशैली, ठसकेदार मांडणी, नाट्यमयता, डौलदार वेधक व वेचक भाषाशैली, मार्मिक उपरोध, मिष्किल छटा, अर्थगर्भ कल्पनारम्य व काव्यपूर्ण दृष्टांत आणि मानवी स्वभावाचे सूक्ष्म सखोल ज्ञान व अभ्यास यामुळे हे " अनगड मोती " मराठी साहित्याचे अमोल धन ठरले आहे.

खुसखुशीत, खुमासदार, लालित्यपूर्ण शैली, मानवी स्वभावाचे सखोल ज्ञान, जीवनातील मार्मिक तत्त्व सौंदर्य-जीवनाचा अर्थ, नाट्यपूर्ण, चटकदार घटनाप्रसंग व लेखकाचे अष्टपैलू व्यक्तिमत्त्व हे या गाडगिळी लेखांचे पंचप्राण आहेत. मानवी मनात सहजपणे अवगाहन करण्याची कला त्यांनी उत्कृष्टपणे साध्य केलेली आहे. सूक्ष्म निरीक्षण, कल्पक बुद्धी, डौलदार शैली यामुळे हे लेख वाङ्मयीन सौंदर्याची लेणी ठरतात. कोणत्याही घटनाप्रसंगाला नाट्यमय व ढंगदार वळण देण्याची त्यांची खुबी पाहून वाचक त्या लेखात रंगून जातो. त्यांच्या मिष्किल वृत्तीचे, कोपरखळयांचे मधूनमधून हसू येते; तर केव्हा केव्हा त्याच्या बुद्धीला नवीन ज्ञानाचा लाभ होताच त्याचे मन आनंदाने भरून येते. तर केव्हा केव्हा कृत्रिम दिखाऊ नकली मुखवटे गळून पडल्यानंतर शिल्लक राहिलेले मानवाचे मूळचे रूप पाहून तो स्तिमित होतो.

वि. स. खांडेकरांच्या शब्दात सांगायचे म्हणजे " अनेक चटकदार चिजांचा हा संग्रह " !

---

प्रा. श्री. मे. पळशीकर

# शाकुन्तलाचा साहावा अंक : एक पुनरीक्षण

कविकुलगुरु कालिदासाच्या 'अभिज्ञान-शाकुन्तला'त दोन मीलने आहेत, हे उघड आहे. पहिले मीलन तिसऱ्या अंकाच्या शेवटी कण्वांच्या आश्रमात झालेले दिसते तर दुसरे मीलन-पुनर्मीलन-सातव्या अंकात मारीचांच्या आश्रमात होते. या नाटकात कालिदासाचे नाट्यकौशल्य आपल्याला पुरेपूर जाणवते. कुठलीही घटना, कोणताही प्रसंग कोणत्यातरी विशिष्ट प्रयोजनाशिवाय तो लिहीत नाही. एवढेच नव्हे तर एखादा शब्द देखील हा नाटककार विनाकारण कधीही लिहीत नाही. त्याच्या प्रत्येक शब्दात सूचकता, अर्थप्रागल्भ्य इ. गुण दिसून येतात. निव्वळ वर्णनासाठी म्हणून तो वर्णन करणार नाही. त्याच्या नायकाच्या विरहोद्गारात आदर्श विरही-नायक रेखाटलेला असेल, पण त्याचबरोबर त्याच्या विरहोद्गारातसुद्धा नाटकाच्या अंतिम फलाच्या दृष्टीने कोठलेतरी नाट्यप्रयोजन लपलेले असते. या दृष्टिकोणातून शाकुंतलाच्या सहाव्या अंकाचेदेखील कांहीतरी प्रयोजन असले पाहिजे, असे वाटू लागते. हे प्रयोजन कोणते असावे याचा शोध घेण्याचा हा एक अल्पसा प्रयत्न आहे.

पहिल्या मीलनाचे वेळी शकुन्तलेने आपल्या मनामध्ये भावी संसाराचे जे चित्र रेखाटले असेल, ते तिच्या दुर्दैवाने विस्कटून टाकले, असे आपल्याला दिसून येते. 'तीन दिवसांच्या आंत तुला न्यायला माझा माणूस येईल,' असे आश्वासन दुष्यंताने शकुंतलेला दिले व तिच्या बोटात आपले नांव असलेली अंगठी घातली. याप्रसंगी शकुंतलेला स्वर्ग ठेंगणा वाटला असेल, सर्व सुखांकडे तुच्छतेने बघत ही मुलगी मनातल्या मनात राजवाड्यातील आपल्या भावी जीवनाविषयी अनेक स्वप्ने रंगवीत बसली असेल. पण ज्या दैवाच्या शांतीसाठी कण्वबाबा तीर्थक्षेत्री गेले होते, ते शकुंतलेचे दैव-दुर्दैव शेवटी तिच्या सुखाच्या आड आलेच! त्याने अखेर आपला डाव साधलाच!! अगदी तोंडाशी आलेला अमृताचा पेला शकुंतलेच्या दुर्दैवाने अकस्मात् झडप घालून सांडून दिला!!!

दुर्वासांच्या रूपाने शकुंतलेचे दुर्दैव तिच्या दारात उभे ठाकले. त्यांच्या शापाने शकुंतलेची अंगठी हरपते व दुष्यंताची शकुंतला-विवाहाची स्मृति नष्ट होते, व परिणामी दुष्यन्त शकुन्तलेला झिटकारतो. उघड उघड तो तिला स्वैरिणी ठरवतो व तिचा परित्याग करतो. हा भयंकर अपमान शकुंतलेला सहन होत नाही व तिचे तेजस्वी रूप आपल्याला पाचव्या अंकात पहायला सापडते. संतापाने ती थरथर कापू लागते व कण्वशिष्यांच्या मागे जाऊ लागते, पण तेही तिला आपल्याबरोबर येऊ देत नाहीत. शेवटी पुरोहित मध्ये पडतो व 'शकुंतला प्रसूत होईपर्यन्त माझ्याकडे राहील, कारण सिद्धांच्या आदेशाप्रमाणे दुष्यन्ताला चक्रवर्तिलक्षणांनी युक्त असा पुत्र होईल,' असे तो म्हणतो. परंतु असल्या अपमानित जिण्यापेक्षा मेनका तिला स्वर्गात घेऊन जाते, व तिथेच शकुंतलेला सर्वदमन ऊर्फ भरत नावाचा मुलगा होतो.

सहाव्या अंकात योगायोगाने दुष्यन्ताची अंगठी सांपडते. अंगठी ज्या शचीतीर्थात शकुन्तलेकडून हरवते, तिथल्याच एका कोळयाला सहा वर्षांनी ही अंगठी एका माशाच्या पोटात सापडते. अंगठी विकायला म्हणून तो बाजारात येतो व तिथेच त्याला राजपुरुष पकडतात. ही अंगठी राजमुद्रा असल्यामुळे असला गुन्हेगार प्रत्यक्ष राजासमोर नेला पाहिजे, अशा विचाराने राजश्याल अंगठी घेऊन दुष्यन्ताकडे जातो. अंगठी पाहिल्याबरोबर कोळयाला शिक्षा करण्याऐवजी अंगठीच्या किंमतीएवढे धन त्याला बक्षीस देण्याची आज्ञा दुष्यन्त करतो. अंगठी पाहिल्याबरोबर दुष्यन्तासारख्या धीरगंभीर पुरुषाच्याही डोळयात अश्रू उभे राहतात, हे पाहून राजश्यालाला मोठे आश्चर्य वाटते व कदाचित् 'अंगठी पाहून राजाला कोणातरी प्रिय व्यक्तीची आठवण झाली असावी,' असे त्याला वाटते. ही प्रिय व्यक्ति म्हणजे दुसरी-तिसरी कोणी नसून त्याची प्रियतमा शकुंतलाच आहे हे चाणाक्ष








प्रेक्षकांच्या व वाचकांच्या ध्यानात आल्यावाचून रहात नाही.

आणि यानन्तर एक पारंपरिक (Typical) विरही नायकाच्या स्वरूपात दुष्यन्त प्रवेश करतो. शकुन्तलेच्या स्मृतीमुळे तो व्याकुळ बनला आहे. त्याला दुसरे काही सुचत नाही. वसंतऋतूचे आगमन होऊनही त्याचे स्वागत तो करीत नाही, इतकेच नव्हे तर आपल्या राज्यात कोणीही वसंतोत्सव साजरा करू नये, अशी त्याची कडक आज्ञा आहे. [१]

शकुन्तलेला आपण निष्कारण घालवून दिले याचा त्याला अतोनात पश्चात्ताप होतो. एकदा सुटून गेलेला बाण जसा परत येऊ शकत नाही, तशी शकुन्तला –प्रत्याख्यानाची घटना घडून आलेली आहे. कोणत्याही उपायाने आता शकुन्तला परत मिळणे शक्य नाही. शकुन्तलेच्या रूपाने आपण होऊन चालत आलेले भाग्यच जणू त्याने अव्हेरले होते, याचा त्याला खरा पश्चात्ताप आहे. या पश्चात्तापाचे शल्य त्याच्या हृदयात खोलवर जाऊन बसले होते. त्याचे मन शकुन्तलेविषयी खरोखरीच अपराधी आहे, आणि म्हणूनच विरहाचे आर्त उद्गार त्याच्या तोंडून बाहेर पडतात. पुनः पुनः शकुन्तलेच्या निरपराधित्वाविषयी तो विदूषकाला आवर्जून सांगतो. पण या सर्व विरहोद्गाराचे प्रयोजन काय असावे असा एक प्रश्न आपल्यापुढे उभा रहातो. या प्रश्नाचे उत्तर पुढीलप्रमाणे देता येईल :

दुष्यंत–शकुंतला–पुनर्मीलन अपरिहार्य आहे. ते होणे अटळ आहे, कारण देवांनीच ते आता मनावर घेतले आहे;[२] व त्याप्रमाणे सातव्या अंकात हे मीलन घडून येतेही, जरी अलौकिक शक्तीच्या मदतीने हे पुनर्मीलन होणार असले तरीपण जोपर्यंत शकुंतलेचे मन दुष्यंताच्या बाबतीत कलुषित आहे, तोपर्यंत त्या मीलनाला– केवळ शारीरिक संमेलनाला– काहीतरी अर्थ उरतो का ? दुष्यंत मनाने सध्या ज्या पातळीवर आहे, त्याच पातळीवर जोपर्यंत शकुंतला येत नाही, तोपर्यंत त्यांच्या मीलनाला काहीही अर्थ नाही, दुष्यंत–शकुंतला मनाने एकरूप झाले म्हणजे खऱ्या अर्थाने त्यांचे मीलन झाले, असे म्हणता येईल. आणि सहाव्या अंकाचे नेमके हेच प्रयोजन आहे, असे मला वाटते. सानुमतीला मुद्दाम राजवाड्यात पाठविण्याचा शकुंतलेचा हेतु तरी हाच असला पाहिजे. [३] आपल्या पश्चात् दुष्यंताची वागणूक कशी आहे ? त्याला आपली आठवण येते का ? की तो खरोखरच आपल्याला विसरला ? त्याने आपल्याला फसवले तर नाही ना ? अशा अनेक शंका शकुंतलेच्या मनात घर करून असतील, आणि म्हणूनच सानुमतीला तिने राजवाड्यात प्रत्यक्ष जाऊन तिथली काय बातमी आहे हे जाणून घेण्यासाठी पाठविले, आणि सानुमतीच्या दृष्टीस पडला तो पश्चात्तापदग्ध दुष्यंत, राज्यातील वसंतोत्सव बंद करणारा दुष्यंत, शकुंतलेसाठी अश्रु ढाळणारा दुष्यंत, तिच्या आठवणींनी बेशुद्ध पडणारा दुष्यंत ? दुष्यंताची ही अवस्था पाहून तिला हर्ष होतो.[४] ' या दुष्यंताने माझ्या सखीच्या मनातील प्रत्याख्यानाचे शल्य काढून टाकले ' असे उद्गार ती काढते.[५] स्वतःवर अकारण झालेल्या अन्यायामुळे चिडलेली शकुंतला अस्वस्थ असते. उत्तररामचरितातील सीतेप्रमाणे ती संतापलेली असते. परंतु त्याच सीतेने रामाची आर्त हाक ऐकल्यावर विरघळून जाऊन रामाला प्रेमाने स्पर्श करावा, तशी तिची अवस्था होणे आवश्यक आहे. सीतेप्रमाणेच तिच्याही मनातील परित्यागरूपी शल्य संपूर्णपणे निघून जाऊन दुष्यंताशी मीलन व्हायला तिच्या मनाची तयारी झाली पाहिजे.

---

१. पहा अंक ६. कंचुकी " मा तावत् । अनात्मज्ञे, देवेन प्रतिषिद्धे वसंतोत्सवे त्वमाम्रकलिकाभंगं किमारभसे ? "

२. अंक ६. सानुमती ' ... ... अथवा श्रुतं मया शकुन्तलां समाश्वासयन्त्या महेन्द्रजनन्या मुखाद् " यज्ञभागोत्सुका देवा एव तथानुष्ठास्यन्ति यथाऽचिरेण धर्मपत्नीं भर्ताभिनन्दिष्यति " इति ।

३ पहा अंक ६. सानु " सांप्रतमस्य राजर्षेरुदन्तं प्रत्यक्षीकरिष्यामि ...
लतासंश्रिता द्रक्ष्यामि तावत्सख्याः प्रतिकृतिम् । ततोऽस्या भर्तुर्बहुमुखमनुरागं निवेदयिष्यामि । "

४ कित्ता– सानु० – " अस्य संतापेनाहं रमे । "

५ अंक ६ सानु० – " सर्वथा प्रमार्जितं त्वया प्रत्यादेशदुःखं शकुन्तलायाः । "








सीतेप्रमाणे तिचे मन दुष्यंताविषयी निःशंक झाले पाहिजे तरच मनाने ती दुष्यंताशी एकरूप होऊ शकेल. हेच माझ्या दृष्टीने सहाव्या अंकाचे मुख्य प्रयोजन आहे. परंतु उत्तररामचरितात भवभूतीने ही समस्या ज्या समर्थतेने हाताळली आहे व त्यात त्याला जे अपूर्व यश मिळाले आहे- त्याने जी पातळी गाठली आहे तेवढे यश व ती उंची कालिदासाला गाठता आलेली नाही. उत्तररामचरितामध्ये भवभूतीने सीतेला प्रत्यक्ष हजर करून तिलाच रामाच्या पश्चात्तापदग्ध-हृदयाचे दर्शन घडविले आहे. त्यामुळे सातव्या अंकात निर्मळ मनाने ती रामाशी एकरूप होऊ शकली. शाकुंतलात कालिदासाने शकुंतलेऐवजी तिची सखी– सानुमती– हजर ठेवली आहे. तिच्या सांगण्यावर विश्वास ठेऊनच अर्थात् शकुंतला दुष्यंताविषयी निःशंक बनते, हे तितकेसे पटत नाही. सानुमतीच्या ऐवजी शकुंतलेला 'तिरस्करणी' विद्येने गुप्त ठेऊन त्या ठिकाणी हजर ठेवण्यात जे औचित्य किंवा अकृत्रिमता नाट्यदृष्ट्या साधली असती, ती सानुमतीला हजर ठेवून साधलेली नाही, असे म्हणावेसे वाटते.

प्रा. गजेंद्रगडकरांनी या ठिकाणी एक वेगळीच उपपत्ती सांगितली आहे. ती थोडक्यात पुढे दिल्याप्रमाणे आहे : सहाव्या अंकात जो विरही व पश्चात्ताप करणारा दुष्यन्त दाखविला आहे त्याचे कारण असे की शकुन्तला या मर्त्य जगाच्या वर उच्च ठिकाणी गेली आहे, ज्या ठिकाणी अतिशय पवित्र व उदात्त असे वातावरण असून मर्त्य मानवांना त्या ठिकाणी प्रवेश देवादिकांच्या कृपेशिवाय शक्य नाही. अर्थातच पुण्यवंतांच्या या ठिकाणी रहाणारी ही शकुन्तला दुष्यन्ताबद्दलच्या आसक्तीने रहित झाली असून त्याऐवजी आता स्वर्गीय प्रेमाने तिचे मन भारलेले आहे. अशा देवतातुल्य असलेल्या शकुन्तलेशी मर्त्य दुष्यन्त एकरूप होणे कसे शक्य आहे? असे मीलन कृत्रिम ठरले असते. यानंतर दुष्यन्ताला स्वतः निपुत्रिक असल्याबद्दल जो पश्चात्ताप होतो, याचे कारण त्याचे राज्य पुढे चालवायला कोणी वारस नाही, हे नसून त्याच्या पश्चात त्याच्या पितरांना कोणी तर्पण करणारा उरणार नाही, हे आहे. अशा रीतीने व्यक्तिगत स्वार्थापासून दुष्यन्त दूर गेला असून त्याच्या मनात पारलौकिक जीवनाबद्दलचे म्हणजेच उच्च–स्वर्गीय असे विचार येत आहेत. आणि म्हणूनच तो शकुन्तलेशी एकरूप होण्यास पात्र ठरतो. शकुन्तलेशी होणारे मीलन म्हणजे एखाद्या देवतेशी होणारे मीलन होते, दुष्यन्त या मीलनाला अपुरा आहे. त्याचे अंगी मीलनासाठी पात्रता निर्माण करणे हे या अंकाचे कार्य आहे, असे गजेंद्रगडकरांचे प्रतिपादन आहे[१] असे करताना गजेंद्रगडकरांनी काही गोष्टी गृहीत धरल्या आहेत. एक

---

१ अभिज्ञानशाकुन्तलम् संपा : A. B. Gajendragadkar. Publisher– Popular Book Store Surat, 1950. Notes page No. 487.

"... Shakuntalā as we would see in the next act, had been raised from this mortal world, for which she was too good & in which she had suffered even more than Dusyanta, to the region of bliss, an atmosphere of purity & sanctity, a place inaccessible to mortals unassissted by divine agency ...... From being an ideally virtuous woman of the world she had raised herself by her pure exemplary life to the position of almost a goddess in the holy peaceful hermitage of Kaśyapa, her love for Dusyanta was purged of all material & worldly consideration & had developed into divine affection. How could Dusyanta, the worldly king be united with a goddess of this kind ? Such a union would have been unnatural. Sakuntala was too good for Dusyanta now ... The king is then raised, even like Śakuntala above the sordid worldly atmosphere & no doubt now lurks in our mind regarding his fitness to be united










अशी की शकुन्तलेच्या अंगी अलौकिक तेज, अलौकिक शक्ति आहे. दुष्यन्त तिच्यापेक्षा बऱ्याच खालच्या पातळीवर आहे, व त्याला शकुन्तलेची योग्यता यावी यासाठी या अंकात पश्चात्तापाने त्याचे मन शुद्ध केले आहे. अंकभर रडल्यामुळे त्याचे मनाचे ठिकाणी निर्माण झालेले पाप धुवून निघाले आहे व त्यामुळे निर्मळ झालेल्या मनाने तो शकुन्तला-मीलनाला योग्य झाला असून हेच या अंकाचे प्रयोजन आहे.

या ठिकाणी गजेंद्रगडकर शकुन्तलेच्या ठिकाणी अलौकिकता कोणत्या आधारे चिकटवू पहातात, हे समजत नाही. ती केवळ मेनकेमुळे मारीचांच्या आश्रमात रहाण्यास गेली, हा केवळ योगायोगच होय. शकुन्तला जर कण्व-कन्या असती व ती जर परित्यागानंतर कण्वांच्या आश्रमात रहावयास येती तर तिच्या ठिकाणी हे गुण येऊ शकले नसते, असे गजेंद्रगडकरांना म्हणावयाचे आहे काय? मला तर असे वाटते की शकुन्तलेचा स्वभावच असा सोशिक, शांत, ऋजु आहे– या गुणाचे दर्शन आपल्याला १ ते ४ या अंकात होते – की ती स्वर्गात असो वा मृत्युलोकात, राजवाड्यात असो वा आश्रमात, ती तशीच पतिपरायण, क्षमाशील व सात्त्विकच राहिली असती यात शंका नाही. सातव्या अंकात शकुन्तला दुष्यन्ताला पाहिल्याबरोबर जी शान्त राहिली त्याचे कारण मला वाटते सानुमतीने सहाव्या अंकात पाहिलेली दुष्यन्ताची स्थितितिला सांगितली हे आहे. सानुमतीकडून दुष्यन्ताच्या मनाचे ज्ञान तिला अगोदरच झालेले आहे, आणि त्यामुळेच निष्पाप दुष्यन्ताला भेटण्याला आतुर झालेल्या शकुन्तलेचा कण्ठ दाटून येतो, तोंडातून शब्द बाहेर पडू शकत नाहीत.[१] दुष्यन्ताच्या मनाची काहिली झाल्याचे तिच्या सखीने तिला सांगितले, त्यामुळेच दुष्यन्ताने पाय धरताच त्याला उठवून त्याच्या त्या निष्ठुरपणे वागण्याचा दोष स्वतःकडे घेते.[२] त्याच्या मनाच्या या अवस्थेचे ज्ञान तिला नसते तर त्याने कितीही नाक घासले असते तरी तिने त्याला क्षमा केली नसती, हे तिच्या पाचव्या अंकातील तेजस्वी व बाणेदार स्वभावाचे आपल्याला जे दर्शन घडते त्यावरून सहज लक्षात येते. या ठिकाणी तिचे अंगी अलौकिक गुण चिकटवून तिचा महिमा निष्कारण वाढविणे अप्रस्तुत आहे, असे मला वाटते.

दुष्यन्ताने शकुन्तलेला अव्हेरले त्यात त्याचा काय दोष होता? तो कशामुळे अधःपतित होता? कोणत्या कारणांमुळे तो शकुन्तला-मीलनाला अयोग्य होता? दुष्यन्ताला खालच्या पातळीवरचा समजणे, त्याच्या अंगी पाप चिकटवणे म्हणजे दुष्यन्तावर फार मोठा अन्याय आहे. शकुन्तलाविवाहाचे जिथे स्मरणच होत नाही अशा अवस्थेत तिचा स्वीकार करणे म्हणजे एका परस्त्रीला ( जी गरोदर आहे ) स्वीकारणे हेच फार मोठे पातक झाले असते. हे पातक दुष्यन्ताने केले नाही यातच त्याचा मोठेपणा आहे. दुष्यन्ताला याठिकाणी फार संयम बाळगावा लागला, मोठ्या विवेकीपणे त्याने हा निर्णय घेतला आहे. आणि एवढेही करून दुष्यन्त पापी? याठिकाणी शकुन्तला जितकी निर्दोष आहे तितकाच दुष्यन्तही निर्दोष आहे. दोघेही एकाच पातळीवर आहेत. दोघांचे मीलन व्हावयास कोणीही वरच्या पातळीवर जायला नको किंवा कोणीही एक पायरी खाली यायला नको. दुष्यन्त स्वपराक्रमानेच स्वर्गातही पूजित होतो. स्वर्गात इंद्राच्या साह्याला जाणे यातच दुष्यन्ताचा मोठेपणा दडलेला आहे. कुठल्याही

with his Saintly dharmapatni after this transformation in the nature of his love & his philonthrophic mission in heaven on behalf of the gods ... It was a spiritual union & from that point of view the preparation of Duśyanta was yet to take place. This spiritual preparation of the king is the main purpose of Act VI, which ... has been successfully depicted by the poet."

१ शकुं – जयत्वार्यपुत्रः ( इत्यर्धोक्ते बाष्पकण्ठी विरमति। )

२ अंक ७ शकुं – उत्तिष्ठत्वार्यपुत्रः । नूनं मे सुचरितप्रतिबन्धकं पुराकृतं तेषु दिवसेषु परिणामाभिमुखमासीद्येन सानुक्रोशोऽप्यार्यपुत्रो मयि विरसः संवृत्तः ।

Spiritual preparation ची याठिकाणी आवश्यकता नाही, व दुष्यन्ताचा प्रयत्न या हेतूने नाहीही. शकुन्तला-प्राप्तीसाठी आपण अशा प्रकारचे प्रायश्चित्त घेतले पाहिजे, अमुक व्रताचरण केले पाहिजे, अमुक याग केला पाहिजे हे व असे हेतूपूर्वक प्रयत्न जर दुष्यन्ताकडून झाले असते तर त्याला Preparation म्हणता आले असते, मग त्याला आपण किंवा नाटककाराने Fitness certificate ही दिले असते. पण यापैकी दुष्यन्त काहीएक करीत नाही. तो केवळ आपल्या मित्राजवळ झालेल्या चुकीबद्दल पश्चात्ताप व्यक्त करीत आहे; व त्याचा हा पश्चात्ताप सानुमती पहाते. तिच्या मनाची खात्री होते. दुष्यन्त खरोखर याठिकाणी निरपराधी आहे, असे तिला जाणवते. दुष्यन्ताचे शकुन्तलेसंबंधी विचार ऐकून ती क्षणभर हतबुद्ध होते. दुष्यन्ताच्या वागण्या-बोलण्याचा मेळ कसा लावावा, हे तिला समजत नाही. [१] पण पुढे लगेच तिला त्याच्या निष्पाप हृदयाचे दर्शन होते. त्याचा तो अनुशय पाहून तिच्या मनात अनुकम्पा निर्माण होते. त्याची निपुत्रिकत्वाबद्दलची परिवेदना पाहून तर तिच्या मनात क्षणभर असेही येते की ' सांगून टाकावे या दुष्यन्ताला की बाबारे, तू निपुत्रिक नाहीस. तुझा मुलगा हेमकूटपर्वतावर सुखात आहे. तुझी पत्नीही सुखरूप आहे काही काळजी करू नकोस. ' पण हे ती सांगत नाही. त्यांची भेट निश्चित होणार आहे, कारण आता देवांनीच ते मनावर घेतले आहे. शकुन्तलेच्या मनाला प्रत्याख्यानाने जी जखम झाली होती ती भरून यावी, प्रत्यादेशाचे शल्य निघून जावे, यासाठीच हा सारा अंक उभारला आहे, असे आपण सानुमतीच्या बोलण्याकडे जरा बारकाईने लक्ष दिले म्हणजे लक्षात येईल.

सातव्या अंकात शकुंतलाही याच बाजूने साक्ष देते. " अथवा यथा सानुमत्याख्यातं तथा संभाव्यत एतत् । " याठिकाणी सानुमतीने आपली कामगिरी चोख बजावली आहे असे दिसते. म्हणूनच दुष्यंताचे आगमन म्हणजेच " थोर भाग्य " असे ती म्हणते. हे तिचे मनोगत विचार ती दुष्यंताला भेटण्याअगोदर बोलून दाखवीत आहे, हे लक्षात घ्यावे. सातव्या अंकात अजूनही एक गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे व ती म्हणजे शकुंतला दुष्यंताने म्हटल्याबरोबर त्याच्यासह मारीचांच्या पाया पडण्यास जाते. त्याचे कारण तिचे मन सानुमतीने दुष्यंताच्या बाबतीत अगोदरच स्वच्छ केले आहे. तसे नसते तर दुष्यंताने आपल्यावर अन्याय केला याची रुखरुख तिच्या मनाला लागून ती त्याच्याबरोबर जाती ना ! शापाचा वृत्तान्त नंतर त्यांना मारीच सांगतात, तेव्हा दोघांनाही हायसे वाटते. [२] परंतु हे सर्व घडून आले आहे सानुमतीमुळे आणि हेच या सहाव्या अंकाचे कार्य आहे, असे मला वाटते. इत्यलम् ।

---

१ अंक ६ – सानु – पूर्वापरविरोध्यपूर्व एष विरहमार्गः ।

२ अंक ७ दुष्यन्त – ( सोच्छ्वासम् ) एष वचनीयान्मुक्तोऽस्मि ।

शकुं – ( स्वगतम् ) दिष्ट्याऽकारण प्रत्यादेशी नार्यपुत्रः ।








श्री. वि. म. बेडेकर

# बर्ट्रंड रसेल यांचे आत्मचरित्र[1] (१८७२–१९१४)

## –संक्षिप्त परिचय

बर्ट्रंड रसेल यांना नुकतेच १८ मे १९६८ रोजी ९६ वे वर्ष संपून, त्यांनी ९७ व्या वर्षात पदार्पण केले आहे. त्यांचे जीवन व लेखन म्हणजे उत्तुंग प्रज्ञा आणि प्रेम व करुणा यानी ओथंबलेले मानव्य यांचा एक विस्मयकारक आविष्कार आहे. गेल्या सुमारे पाऊण शतकात जे त्यांनी मौलिक साहित्य लिहिले, त्यांत, मानवी जीवनाचे कोणतेही असे महत्त्वाचे अंग नसेल, की जे त्यांच्या प्रज्ञेचा स्पर्श होऊन उजळून निघाले नाही. भौतिकशास्त्रे, समाजशास्त्र, धर्म, अध्यात्म, राजकारण इत्यादी क्षेत्रांतील जिज्ञासूंना त्यांचे साहित्य सदैवच विचारप्रवर्तक व स्फूर्तिप्रद राहील अशा मोलाचे आहे. अद्ययावत् शास्त्रीय संशोधनाचे निष्कर्ष आपल्या सर्वंकष प्रज्ञेने आत्मसात् करून त्या ज्ञानाच्या प्रकाशात विश्व व मानव, मानव व मानव यांचे संबंध, मानवाचे अंतरंग, हीं उलगडून दाखविण्याचा भव्य प्रयत्न त्यांनी केला आहे व मानवजातीच्या कल्याणाने प्रेरित होऊन भावी काळातील वैयक्तिक व सामाजिक जीवनाची घडण कशी असावी याची दिशा दाखविली आहे.

म्हणूनच रसेल यांच्या आत्मचरित्राचे त्यांच्या वाचकांना विशेष महत्त्व आहे. प्रस्तुत आत्मचरित्राच्या या पहिल्या खंडांत त्यांनी आपल्या नेहमीच्या मनमोकळेपणाने आपल्या जीवनाच्या पूर्वार्धाचा आढावा घेतला आहे. त्यातून त्यांच्या असामान्य बुद्धिमत्तेबरोबरच, त्यांच्या ठिकाणी असलेल्या दुर्दम्य सहज-वासनाभावना-प्रेरणांचे ओझरते दर्शन घडून येते. कुटुंब, समाज, समाजातील विशेष व्यक्ती, भोवतालचा निसर्ग– यांच्या विविध बऱ्या-वाईट संस्कारांतून त्यांनी आपले विश्वमानवी समाजोन्मुख व्यक्तिमत्त्व स्वतःच्या चिन्तनशीलतेने, अंतर्दृष्टीने, विवेकाने कसे घडविले याचे प्राञ्जल चित्र आपणासमोर उभे रहाते.

आत्मचरित्राच्या प्रारंभी रसेल यांनी त्यांच्या सध्याच्या मनोवृत्तीची निदर्शक अशी दोन अत्यंत मार्मिक निवेदने जोडली आहेत. पहिले निवेदन त्यांची विद्यमान पत्नी एडिथ हीस उद्देशून केलेले असून त्यात आपल्या रोमांचकारी, अशांत भावजीवनाची परिणति शान्तरसात कशी झाली आहे, हे सांगितले आहे. दुसरे निवेदन 'यासाठी मी जगलो' असे असून ते जणू त्यांच्या समग्र अन्तर्जीवनाचे अतिसंक्षिप्त असे आत्मचरित्रच होय असे म्हणण्यास हरकत नाही. दोन्हीही निवेदने पुढे अनुवाद करून दिली आहेत :

### १ "एडिथ हीस"

"वर्षानुवर्षे दीर्घकाळ
मी सारखी शोधीत होतो मनःशान्ति.
मला अनुभवायला मिळाल्या

हर्षाच्या ऊर्मी,
दुःखाच्या यातना,
वेडाच्या लहरी
एकाकीपणाची बोंच !

मी अनुभविली
मर्मभेदी एकलेपणाची व्याकुळता !
पण, मनःशान्ति ! ती मात्र मला गवसली नाही.
आता, वृद्धपणी, आयुष्याच्या अखेरी-अखेरी
तुझी झाली ओळख.
तुझी ओळख पटल्यावर,
मला अनुभवायला मिळाल्या

हर्षाच्या ऊर्मी,
नि मनःशान्ति.

1 The Autobiography of Bertrand Russell ( 1872–1914 ), George Allen and Unwin Ltd, London, pp. 1–230 (1967 )








एकलेपणाने घालविलेल्या इतक्या वर्षानन्तर
मी अनुभवितो आहे
माझ्या सुखस्वप्नातला खरा विसावा, खरे जीवन व प्रेम.
आता मी निद्राधीन होईन
तो परिपूर्तीचे सुख अनुभवीतच."

## २ "यासाठी मी जगलो !"

तीन भावना– मूळ साध्या पण भयंकर जोरदार ! त्यांनी माझ्या जीवनावर वर्चस्व गाजविले आहे. प्रेमाविषयी अभिलाष, ज्ञानाचा हव्यास आणि मानवजातीच्या दुःखाबद्दल अपार करुणा. या भावनांच्या झंझावातात, दुःखाच्या गंभीर सागरावर, माझे जीवन सैरावैरा, वाटेल तसे भरकटत जाऊन, घोर निराशेच्या तीरावर येऊन आदळले आहे.

"प्रेमाचा अभिलाष धरला याचे कारण, एक तर त्यामुळे जीवन हर्षाच्या ऊर्मींनी भरून गेले. इतक्या आनंददायक ऊर्मी की काही प्रहराच्या सुखाकरिता सर्व जीवन भिरकावून देण्याची माझी तयारी होती. दुसरे कारण असे की, प्रेमामुळे एकाकीपणा– तो भीषण एकाकीपणा की ज्याने पछाडले असता मानवी जीवाची थरथर कापणारी जाणीव ऐहिक जगाच्या कडेवरील कड्याच्या काठी उभी राहून त्यापलीकडे पसरलेल्या अगाध अकाळविकाळ शून्यतेकडे डोकावून पहात असते–तो एकाकीपणा कमी होतो. आणखी कारण असे की, प्रेमाच्या ऐक्यात, जणूं साक्षात्कारी अनुभूतीच्या छोट्या स्वरूपात, ज्या स्वर्गाची साधूंनी व कवींनी कल्पनाचित्रे रंगविली आहेत, त्या स्वर्गाची प्रत्यक्ष कल्पना आणून देणारे दर्शन मला झाले आहे. या कारणाकरिता मी प्रेमाचा अभिलाष धरला. असे प्रेम मिळणे मानवी जीवनात असंभवनीय वाटत असले, तरी ते शेवटी मला मिळाले.

"ज्ञानाचाही हव्यास मी तितक्याच उत्कटतेने बाळगला. मानवांची हृदये समजून घ्यावी अशी मी सारखी इच्छा बाळगून होतो. तारे का प्रकाशतात ह्यांचेही ज्ञान करून घेण्याची आकांक्षा मी बाळगीत आलो. पायथॅगोरसपासून प्रेरणा घेऊन उत्पन्न झालेल्या ज्या विचाराच्या शक्तीमुळे सारख्या होणाऱ्या बदलावर संख्येने स्वामित्व गाजविले आहे, ती पायथॅगोरी शक्ती समजून घेण्याचा मी प्रयत्न केला आहे. – अर्थात् या गोष्टींपैकी फारच थोडे मी साध्य केले आहे.

"प्रेम आणि ज्ञान यांच्या प्राप्तीकरिता शक्य तो प्रयत्न करीत असता, माझी दृष्टि जणू वर आकाशाकडे लागली होती. परंतु करुणेच्या भावनेने नेहमीच मला पृथ्वीकडे खेचीत आणले आहे. दुःखाच्या किंकाळ्यांचे पडसाद माझ्या हृदयात सदैव उमटले आहेत. दुष्काळात सांपडलेली बालके, जुलमी शास्त्यांकडून छळले जाणारे दुबळे जीव, आपल्या मुलांना ओझे झालेले व नकोसे वाटणारे अनाथ वृद्ध, फार काय, एकलेपणाने, दारिद्र्याने आणि दुःखयातनांनी भरलेले हे सर्व जग– हे पाहून हे मानवी जीवन आहे की त्याचे हे विडंबन आहे असे मला वाटू लागते. जगातले हे दुरित कमी करावे अशी मला सारखी तळमळ वाटत आली आहे. पण ते मी करू शकत नाही याचेच मला पुन्हा पुन्हां दुःख होत असते.

"असे जगलो आहे मी जीवन. जीवन जगण्यायोग्य आहे व जर मला पुन्हा संधि मिळाली तर मी ते आनंदाने जगेन."

"रसेल यांच्या प्रस्तुत आत्मचरित्रग्रंथात मुळात ७ प्रकरणे आहेत : १ बाल्य २ कौमार ३ केंब्रिज ४ वधूनिश्चिति ( engagement ) ५ पहिला विवाह ६ 'प्रिन्सीपिआ मॅथिमॅटिका' ७ पुन्हा केंब्रिज.– याच क्रमाने रसेल यांच्या संक्षिप्त अनुवाद त्यांच्याच शब्दात पुढे जीवनाचा देण्याचा प्रयत्न केला आहे. संक्षिप्त अनुवाद वाचताना सुलभ जावे म्हणून काही बाबतीत वरील प्रकरणांच्या शीर्षकांपेक्षा निराळी अर्थपूर्ण शीर्षके दिली आहेत.

### बाल्य

मी दोन वर्षाचा असतानाच १८७४ साली माझी आई वारली. व पुढे दोन वर्षांनी १८७६ साली माझे वडील वारले. लगेच माझी रवानगी माझ्या वयाच्या चौथ्या वर्षी माझे पितामह– आजोबा लार्ड जॉन रसेल यांच्याकडे झाली. आजोबा पुढे दोन वर्षांनी त्यांच्या वयाच्या ८६ व्या वर्षी वारले. आजीनेच पुढे माझे संगोपन-संवर्धन केले. आजी पुढे १८९४ साली मृत्यू पावली. त्यावेळी माझा विवाह नुकताच झाला होता.

आईविषयी मला काहीं आठवत नाही. माझ्या जन्मानंतर तिने आपल्या आईला माझ्याविषयी वर्णन








करून पाठविले त्याची नोंद सापडते : "बाळाचे वजन ८।। पौंड; २१ इंच लांब आहे. खूप बाळसे आहे. पण दिसायला कुरूप, डोळे निळे. दोन डोळ्यात खूप अंतर. हनुवटी दिसतच नाही. मला खूप दूध आहे. पण बाळाला जर लगेच मिळाले नाही, तर स्वारी अशी काही खवळून उठते, ओरडते, हातपाय झाडते! मग बाळ एकदा पिऊन शांत झाले की, मग आपले डोके वर करून इकडे तिकडे सभोवार टक लावून पहाते!"

माझे वडील अशक्त व फुप्फुसाच्या विकाराने आजारी असत. ते विचाराने बुद्धिप्रामाण्यवादी, स्वतंत्र विचारांचे होते. जान स्टुअर्ट मिलचे मित्र व चेले होते. त्यांचे व माझ्या आईचेही संततिनियमन व स्त्रियांना मतदानाचा हक्क याबद्दल अनुकूल मत होते. माझ्या वडिलांची बरीच मोठी लायब्ररी होती. तिच्यात, ख्रिश्चन, बौद्ध, कान्फुशिअन धर्मावरील पुष्कळ पुस्तके होती. माझ्या वडिलांनी लिहिलेले एक पुस्तक 'धार्मिक श्रद्धांचे विश्लेषण' या अर्थाचे त्यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झाले.

माझा मोठा भाऊ माझ्यापेक्षा ७ वर्षांनी मोठा होता. त्याला शिकवायला एक शिक्षक जे नेमलेले होते ते विज्ञानाचे शिक्षण घेतलेले डार्विनवादी होते. कोंबड्याच्या पिल्लांच्या सहजप्रवृत्तींचा अभ्यास करण्याचा त्यांना छंद होता. त्यामुळे आमच्या घरभर कोंबडीची पिल्ले वावरत असत. हे शिक्षक लौकरच वारले. माझ्या वडिलांनी मला शिकवायला म्हणून दोन शिक्षक ठेवले. ते दोन्हीही शिक्षक निरीश्वरवादी होते. माझे संस्कारसंवर्धन अंध धार्मिक समजुतींच्या चाकोरीतून होऊ नये, स्वतंत्र विचारांचे मला बाळकडू मिळावे म्हणून माझ्या वडिलांनी ही योजना करून ठेवली होती. पण लवकरच माझे वडील वारले. माझ्या आजी-आजोबांना माझ्या वडिलांचे निधार्मिक मत मान्य नव्हते. त्यांनीं माझे शिक्षक काढून टाकून, कायदेशीररीत्या पालक म्हणून मला ताब्यात घेतले. असा मी वयाच्या ४ थ्या वर्षीच माझ्या आजी-आजोबांकडे आलो.

'पेंब्रोक लॉज' म्हणजे माझ्या आजी-आजोबांचें निवासस्थान दुमजली व मोठे व प्रशस्त असून त्याच्या आजूबाजूला दहा एकर मोठे असे विविध वृक्ष-वनस्पतींनी भरलेले पार्क (उप-वन) होते. माझे आजोबा आपल्या ऐन अमदानींत इंग्लंडच्या मंत्रिमंडळातील मुख्य मंत्रिपदापर्यंत पोहोचले होते. त्यांना व्हिक्टोरिआ राणीने हे निवासस्थान रहावयास १८४० पासूनच देऊन टाकले होते. मी या निवासस्थानी १८ वर्षांचा होईपर्यंत होतो. या निवासस्थानातील रमणीय गर्द राईनी भरलेल्या वनश्रीचा व वातावरणाचा माझ्या जीवनावर सखोल परिणाम झालेला आहे. या बागेतून हिंडत असताना, या बागेने भूतकाळात माझ्या आजोबांच्या ऐन ऐश्वर्यशाली अमदानीत, कोणते मोठमोठे राजेरजवाडे, परदेशातील मोठे वकील यांच्या सहवासाचा रुबाब अनुभवला असेल, याचे मी माझ्या मनाशी कल्पनाजाल विणीत असे. माझ्या बाल्य– व– कौमार– काळातील दररोजचा माझा बराच वेळ मी या आमच्या घराच्या सभोवतालच्या उप-वनातून एकटा हिंडत घालविला आहे. त्या उप-वनातील कोपरान् कोपरा, पक्षी, फुले माझ्या परिचयाची झाली होती. कोणते झाड सगळ्यांच्या आधी मोहरणार हे मी ओळखीत असे. मी पहाटे लवकर उठत असे. शुक्राच्या चांदणीचे दर्शन घेत असे. एकदा तर मी शुक्राच्या चांदणीला एक लुकलुकणारा कंदीलच समजलो. सूर्योदयाची मजा पहात, सूर्यास्ताच्या वेळी आरक्त झालेली पृथ्वी व सुवर्णवर्ण झालेले मेघ यांचे सौंदर्य निरखीत, वायूचे सळसळणे ऐकत, तळपून जाणाऱ्या विजेचा अद्‌भुत विस्मय अनुभवीत घालविलेला काळ तो मला चांगला आठवतो. माझ्या बालपणी, विशेषतः कुमारवयांत प्रवेश केल्यावर, माझ्या ठिकाणी एकटेपणाची जाणीव वाढत गेलेली मला आठवते. ज्याच्याशी मी मोकळेपणाने बोलू शकेन असे कोणीही समानशील माणूस माझ्या आसपास नसल्यामुळे मला तीव्र दारुण निराशेने पछाडले होते. या निराशेच्या मगरमिठीतून मला वाचविणाऱ्या तीनच गोष्टी होत्या : निसर्ग, पुस्तके आणि (पुढे सुरू झालेला) गणिताचा अभ्यास.

माझी आजी राजकीय व धार्मिक बाबतीत उदारमतवादी होती; पण नीतिनियमांच्या बाबतीत सनातनी व अत्यंत कडक होती. 'प्रेमात पडणे' म्हणजे काय चीज आहे ह्याची ती कल्पनाही करू शकत नव्हती, असा माझा तिच्या बोलण्यावरून ग्रह झाला.











तिने एकदा आपल्या आयुष्यातील पुढील गोष्ट मला सांगितल्याचे आठवते: "माझा विवाह होऊन पतीबरोबर 'मधुचंद्रा' करिता निघाले असताना मी इतक्या गोंधळलेल्या मनःस्थितीत होते की, आई आमच्या-बरोबर आल्यावर मला बरे वाटले". अर्थात् ती अत्यंत कर्तव्यदक्ष गृहिणी होती आणि आजोबांचे घर तिने अत्यंत चोखपणे सांभाळले, यात शंका नाही. तसेच त्या वेळच्या सुसंस्कृत समाजाच्या आदर्शाप्रमाणे ती अत्यंत सुसंस्कृत होती. फ्रेंच, जर्मन, इटालिअन ती सफाईने बोलत असे. फ्रेंच, जर्मन, इटालिअन भाषेतील अभिजात ग्रंथ तिला चांगले परिचित होते. राजकारण तर तिने १८३० पासून अगदी जवळून पाहिले होते. तिची स्वतःची रहाणी, खाणेपिणे अगदी कडक वळणाचे होते. दारू, तंबाखू, मांसाहार तिला आवडत नसे. ८० वर्षांची होईपर्यंत आरामखुर्चीवर बसून आराम घेण्याची तिला संवय नव्हती. मी १४ वर्षांचा झाल्यावर, मला जसे कळू लागले तसे तिच्या बौद्धिक मर्यादा, नीतिमत्तेबद्दलच्या कडक सोंवळ्या कल्पना मला जरी जाचक वाटू लागल्या, तरी लहान मुलांना जी प्रेमाची गरज व आधार लागतो तो तिने मला पुरवला. माझा जीवनविषयक दृष्टिकोन बनविण्यात तिच्या व्यक्तिमत्त्वाला खूप महत्त्व आहे. तिची निर्भय वृत्ति, सार्वजनिक कार्याबद्दलची आवड, गतानुगतिक गोष्टींबद्दलची तिची तिरस्कारबुद्धि, आणि बहुसंख्य लोकांचे मत अनिष्ट वाटले तर ते झुगारून वागण्याची वृत्ति या तिच्या गुणांचा मला हेवा वाटला आहे. तिने मला बायबलची एक प्रत दिली तिच्या आरंभीच्या पानावर तिने स्वहस्ताक्षराने पुढील अर्थाचे बायबल-मधील वाक्य लिहिलेले होते : "बहुजनसमाज वाईट वागत असला तरी तू तसा वागू नकोस." माझ्या मोठेपणी उत्तरायुष्यात बहुसंख्य लोकांच्या मतांची तमा न बाळगता, अल्पसंख्यांच्या बाजूने मी जो निर्भय वागलो आहे त्याचे बीज माझ्या आजीने लिहून दिलेल्या या वचनात असावे.

माझ्या आजीचे भाऊ व बहिणी हे आमच्या घरी येत असत. त्यातील एक मोठा भाऊ ज्याला आम्ही 'अंकल विलिअम' म्हणत असू त्याची मला एक चांगली आठवण आहे. जूनचा महिना होता. दिवस-भर चांगला सूर्यप्रकाश असल्यामुळे माझा तो दिवस मजेत गेला. रात्री निजताना हे अंकल गंभीर आवाजात मला म्हणाले : "जसजशी वर्षे लोटतात तसतसे माणसाचे सुख, मजा अनुभविण्याचे सामर्थ्य कमी होत जाते. आजचा दिवस जेवढा तुला सुखाचा वाटला तसा पुन्हा पुढचा दिवस तुला वाटणार नाही". हे ऐकून मला तर रडूच कोसळले. अंथरु-णावर पडल्या पडल्या मी किती तरी वेळ रडत होतो. पुढे जेव्हा उत्तरायुष्यातील अनुभवावरून मी माझ्या काकांच्या त्या विधानाचा विचार करतो, तेव्हा ते त्यांचे विधान केवळ असत्यच नव्हे तर निर्दयपणाचे वाटते.

ज्या प्रौढ माणसांच्या मी संगतीत होतो, त्यांना लहान मुलांच्या उत्कट भावना समजू शकत नव्हत्या : मी चार वर्षांचा असताना मला फोटो काढायला नेले. मी चांगले बसावे, हलू नये म्हणून फोटोग्राफरने मला एक 'केक' द्यायचे कबूल केले. मला त्या वेळेपर्यंत एखादीच 'केक' मिळाली असेल. 'केक' आता मिळणार म्हणून मी अगदी गप्प बसलो, हललो नाही व माझा फोटोही चांगला निघाला. पण मला 'केक' मात्र मिळाली नाही! — माझा कित्येक वेळा अपमान झालेला मला आठवतो. एकदा मी आजी-आजोबांबरोबर आगगाडीने निघालो. आग-गाडीचा प्रवास बराच वेळ चालला होता. मी बाहेर पाहून माझ्या बरोबरच्या मंडळींना विचारले "आपण आता कोणत्या देशात आहोत?" सर्वांनी माझ्या-कडे पाहून हसून टवाळी करीत म्हटले, "अरे समुद्र ओलांडून गेल्याशिवाय इंग्लंड देश संपत नाही, हे तुला कळत नाही का?" मी अगदी ओशाळून गेलो.— एकदा आम्ही समुद्रावर गेलो. माझ्या पायात नवीन बूट होते. माझ्या दाईने मला 'बूट ओले होऊ देऊ नकोस' म्हणून बजावून ठेवले होते. आम्ही ज्या खडकावर जाऊन बसलो होतो, त्या खडकाभोवती भरतीच्या लाटांचे पाणी हळूहळू भरू लागले. माझी आत्या मला ओरडून तसाच बुटासकट पाण्यातून चालत येण्याबद्दल सांगू लागली. पण मी काही जागचा हललो नाही. शेवटीं मला त्यांनी उचलून नेले. दाईने केलेल्या मनाईचा मी उल्लेख केलाच नाही. पण 'तू भित्रा आहेस' असे मला प्रवचन ऐकावे लागले.— एकदा आमच्या मंडळींबरोबर लंडन येथे माझ्या आईची








आई लेडी स्टॅन्‌ले यांच्या घरी दुपारी आम्ही जेवायास गेलो होतो. माझ्या ह्या आजी लेडी स्टॅनले खोचक, परखड बोलणाऱ्या म्हणून प्रसिद्ध होत्या. या बाईंच्या पुढे मी अगदी ओशाळून मुखस्तंभ बसत असे. "स्टॅन्‌ले घराण्यातील मुलीचा मुलगा असा रे कसा मुखदुर्बळ !" असे म्हणून ही आजी जास्तीच माझ्यावर चिडत असे. मीही एकदा काही बोलायचे म्हणून तिच्यावर छाप पाडण्याच्या हेतूने बोलून गेलो : "माझी उंची, किनई गेल्या ७ महिन्यात अडीच इंच वाढली आहे. या वेगाने एका वर्षात मी ४३/७ इंच वाढेन." त्याबरोबर आजी म्हणाली : "अरे तुला माहीत नाही का असे अपूर्णांकात बोलू नये म्हणून ! फार तर अर्धे किंवा पाव या अंकात बोलावे." मी उत्तर दिले– "आता मला कळले !". त्याबरोबर आजी म्हणाली "कसा अगदी बापाच्या वळणावर गेला आहे."– असाच एकदा मी तिच्या दिवाणखान्यात बसलो होतो. त्यावेळी १२ वर्षांचा असेन. दिवाणखान्यात बरीच मंडळी जमली होती. त्यांच्यासमोर माझी ही स्टॅन्‌ले आजी मला विचारू लागली– "शास्त्रीय सुबोध वाङ्मय (पॉप्युलर सायन्स) तू काय काय वाचलं आहेस, सांग पाहू" आणि असे विचारून पुस्तकांची नावे धडाधडा सांगून 'हे वाचले आहेस का, ते वाचले आहेस का' अशी तिने सरबत्ती माझ्यावर सोडली. मी त्यापैकी काहीच वाचले नव्हते. शेवटी एक उसासा टाकून, जमलेल्या मंडळींकडे बघून आजी म्हणाली– "माझी नातवंडे हुशार नाहीत !"

माझा मोठा भाऊ माझ्यापेक्षा ७ वर्षांनी मोठा होता. त्याला शाळेत शिकायला ठेवला होता. तो सुट्टीत घरी येत असे. तो आला की, आरंभी मला आनंद होत असे. पण पुढे त्याची मला संगत आवडत नसे. व सुट्टी संपून केव्हा हा परत जाईल असे मला होत असे. तो मला 'बेबी' म्हणून चिडवीत असे व दादागिरी करीत असे. तो मोठा हूड होता व माझ्या आईवडिलांना त्याला वागवून घेणे त्रासदायक वाटू लागले होते. आईच्या स्टॅन्ले घराण्याचा स्वभाव त्याच्यामध्ये उतरला होता. म्हणून आई त्याच्याशी सहानुभूतीने वागे. पण माझे वडील रसेल घराण्यातले. त्यांना व रसेल लोकांना माझा भाऊ 'सैतान' वाटे. अशा वागणुकीमुळे तोही तसाच स्वैरपणे वागू लागला. माझ्या भावाचा स्वभाव स्टॅनले घराण्यातील वळणावर गेला होता. त्याला स्टॅन्ले मंडळींबद्दल जिव्हाळा वाटे तर रसेल मंडळीबद्दल तिटकारा वाटे. माझे अगदी उलट होते. रसेलमंडळीबद्दल मला जिव्हाळा तर स्टॅन्लेमंडळीविषयी मला भीती वाटे. पण मी पुढे जसा मोठा होत गेलो तशा माझ्या या भावना बदलत गेल्या. माझ्या वडिलांकडून रसेलघराण्याचे गुण म्हणजे लाजाळूपणा, हळवेपणा, गूढ तत्त्वज्ञानाची आवड हे माझ्यामध्ये उतरले आहेत; तर आईकडून स्टॅन्ले-घराण्याचे गुण– जोमदारपणा, उत्तम आरोग्य आणि उल्हसित आशावादी वृत्ति– हे माझ्या ठिकाणी आले आहेत. एकंदरींत विचार करता, हा दुसरा आईकडल्या गुणांचा वारसा मला अधिक पसंत आहे.

लहानपणी खाण्यापिण्याच्या बाबतीत मी अगदी कडक शिस्त अनुभवली आहे. चाकोलेटसारखे साखरेचे गोड पदार्थ, फळे खाण्याची मला बंदी होती. एकदा मला आठवते की दुपारी जेवणाच्या वेळेला सगळयांच्या पुढे प्रेट्सवर एक एक संत्रे होते. फक्त माझ्या पुढील बशी रिकामी होती. मी हिय्या करून विचारले–"मला का नाही संत्रे ?" सगळे माझ्याकडे पाहून हसले व मला संत्रे मिळालेच नाही !– पण अशा प्रकारचा आहार असूनही माझी प्रकृति उत्तम होती. एकदां ११ व्या वर्षी मला गोवराचा ताप आला होता. त्याशिवाय मी लहानपणी आजारी पडल्याचे मला स्मरत नाही. हल्लीच्या आहारशास्त्राच्या दृष्टीने आहारन्यूनतेमुळे मला अनेक रोगविकार असावयास पाहिजे होते. कदाचित् माझ्या चोरून फळे खाण्याच्या प्रवृत्तीमुळे, मी रोगमुक्त राहिलो असणे शक्य आहे ! कारण, मी मधून मधून 'कॅब-अपल्स' फळे चोरून खात असे. एकदा माझ्या दाईने मला अर्धा तास एकटे सोडून जाताना बजाविले होते की 'ब्लॅकबेरी फळे खाऊ नकोस !' ती परत आली त्यावेळी मी तिला त्या झाडाखाली सापडलो. "फळे खाल्लीस की नाहीस, सांग." तिने विचारले. "नाही" मी उत्तर दिले. "तोंड उघडून जीभ पुढे काढ बरे !" असे तिने पुढे म्हटल्याबरोबर मी अगदी लाजेने चूर होऊन गेलो. 'आपण किती दुष्ट, पापी आहोत' याची जाणीव होऊन खंत वाटली. हा माझ्या आयुष्यातील खोटे बोलण्याचा पहिलाच

प्रसंग असेल. – माझ्या स्वभावात पुढे बरेच दिवस 'आपण पापी आहोत' ही जाणीव घर करून बसली होती. ख्रिस्ती स्तोत्रांतील माझे आवडते स्तोत्र कोणते असे मला कोणी विचारले तर मी " Weary of earth and laden with my sin " या स्तोत्राचा निर्देश करीत असे.

माझी काळजी घेणारी दाई जर्मन होती. त्यामुळे मला जर्मन इंग्रजीइतके सहज बोलता येऊ लागले. अकरा वर्षांचा असताना मी युक्लिडच्या भूमितीचा अभ्यास सुरू केला. माझा भाऊ मला ती शिकवीत असे. युक्लिडचा अभ्यास ही माझ्या आयुष्यातील एक पहिल्या प्रेमाइतकीच अत्यंत महत्त्वाची घटना होय. या जगात इतका सुंदर मजेदार विषय असेल याची मला तोपर्यंत कल्पनाही नव्हती युक्लिडचा पाचवा प्रापोझिशन अत्यंत कठिण समजला जातो पण मला तसा तो बिलकूल वाटला नाही. आपल्याजवळ काही बुद्धिमत्ता आहे याचे भान त्यावेळी पहिल्यांदा झाले. त्यावेळेपासून पुढे माझ्या ३८ व्या वर्षी, मी व व्हाइटहेड यांनी 'प्रिन्सिपिआ मॅथि'मॅटिका' पुरा करीपर्यंत गणित हा विषय माझ्या आवडीचा व आनंदाचा प्रमुख विषय होता. अर्थात् सगळ्याच सुखाप्रमाणे, हे सुखही निर्भेळ नव्हते. लोक म्हणत की, युक्लिड सिद्धान्त सिद्ध करून दाखवितो– परंतु मला आढळून आले की, युक्लिड काही सिद्धान्त गृहीत ('ॲक्शम') धरतो व माझी निराशा झाली. गणितातील या पूर्व-गृहीत सिद्धान्ताबद्दल माझ्या मनात संशय सदैव घर करून होता. पुढील माझे संशोधन त्या संशय-निवृत्तीच्या उद्देशाने प्रेरित झाले. बीजगणित आरंभी मला जड गेले. कारण शिकविणारा शिक्षक चांगला नव्हता. मला अभ्यासाची विलक्षण गोडी लागली. माझ्या आजीला वाटे की, मला अभ्यासाचा ताण फार पडू नये; म्हणून शिक्षकाला ती कमी तास शिक-विण्यास सांगे. पण मी अंथरुणावर एका मेणबत्तीच्या उजेडात अभ्यास चालू ठेवीत असे. आजीची चाहूल लागली की मेणबत्ती विझवून पटकन् पांघरुणात डोके खुपसत असे. गणित हा माझा सगळ्यात आवडता विषय, त्याच्या खालोखाल इतिहास. लॅटिन व ग्रीक मला आवडत नसत. माझे घरीच शिक्षण होत असल्यामुळे माझी इतर मुलांच्या तुलनेने काय तयारी होती याची मला कल्पना नव्हती, ती एकदा आली. एका दिवशी बॅलिअल शाळेचे प्रमुख जोवेट हे आमच्याकडे आले असताना, माझे एक अंकल रोलो त्यांना उद्देशून म्हणताना मी ऐकले– " त्याचा अभ्यास अगदी उत्तम चालला आहे ! " त्यामुळे आपण काही बौद्धिक महत्त्वाचे आयुष्यात करून दाखवावे अशी प्रेरणा माझ्यात चेतविली गेली आणि ही महत्त्वाकांक्षा पुरी करण्याच्या आड कोणतीही आडकाठी मी पुढे माझ्या तारुण्यात येऊ दिली नाही.

माझी आजी आधी आधी मला मॅरिआ एजवर्थच्या गोष्टी वाचून दाखवीत असे. एकदा तिने मला म्हटले की, " ' दि फाल्स की ' नावाची मॅरिआ एजवर्थची ही गोष्ट चांगली नाही. म्हणून मी तुला वाचून दाखविणार नाही. " हे ऐकून मी ती सबंध गोष्ट– दरवेळेला ते पुस्तक शेल्फवरून आजीला नेऊन देत असतानाच्या मधल्या वेळेत एक एक वाक्य– अशी वाचून पुरी केली. अमुक मी वाचू नये म्हणून ती जितके प्रयत्न करी तितके ते मी, त्या गोष्टी वाचून, विफल करीत असे. एकदा वर्तमानपत्रांतून एका घट-स्फोटाच्या खळबळजनक प्रकरणाची हकीगत येत असे. वर्तमानपत्राचे ते अंक दररोज आजी जाळून टाकीत असे. ही तिची सावधगिरी मला कळल्याबरोबर, मी ते वर्तमानपत्र दररोज जाऊन आणीत असे व तिच्या हाती तो अंक पडेपर्यंत, त्या घटस्फोट-प्रकरणाचा शब्दन् शब्द वाचून काढीत असे. पुढे मला चांगले वाचता येऊ लागल्यावर, मीच तिला शेक्सपिअर, मिल्टन, ड्रायडन, जेन ऑस्टन यांचे ग्रंथ वाचून दाखवू लागलो.

मला मधूनच अशी हुरहुर वाटत असे की, आपले आईबाप जिवंत असते तर आपण किती, किती सुखी झालो असतो ! एकदा आजीजवळ मी माझी ही भावना बोलून दाखविली. त्यावर ती बोलून गेली : " ते नाहीत हे तुझे चांगले नशीब समज ". मला तिच्या बोलण्याचा राग आला. व वाटले की किती मत्सरी, खुनशी ही बाई आहे ! तिला असे वाटण्याला त्या वेळच्या व्हिक्टोरिअन काळच्या नीतिविषयक दृष्टि-कोनाप्रमाणे सबळ कारणही होते हे त्यावेळी माझ्या लक्षात आले नाही. माझी आजी तशी कितीही आत्मसंयमी दिसत असली तरी तिला वाटणारे दुःख, उद्वेग तिला

लपविता येत नसे. तिच्या चेहऱ्यावरून ते दिसून येत असे. सहज बोलण्याच्या ओघांत, कोणी वेडा झाला अशा-सारखा उल्लेख आला की तिच्या चेहऱ्यावर दुःखाच्या यातना उमटलेल्या दिसत. मला त्याचे कोडेंच वाटे. पुढे काही वर्षांनी मला माहीत झाले की, तिचा एक मुलगा वेडयाच्या इस्पितळांत आहे. म्हणून त्याला वेड कसे लागले याची मी जी गोष्ट ऐकली आहे ती अशी : हा मुलगा लष्करांत अधिकारी होता. तो अगदी निर्व्य-सनी व शुद्ध वर्तनाचा होता. म्हणून त्याचे सहकारी अधिकारी त्याला चिडवीत. एकदा त्यांनी गंमत म्हणून लष्करांतील एक पाळीव अस्वल त्याच्यावर सोडले. भीतीने तो मुलगा सैरावैरा पळत सुटला. तो इतका भेदरून गेला की त्याची स्मृतीच नष्ट झाली. त्याला शेवटी वेडयांच्या इस्पितळात टाकले. त्याचे खरे नाव कोणाला सांगितलेच नाही. मध्येच रात्री तो "अस्वल, अस्वल" म्हणून ओरडत उठे. एकदा त्या लहरीत तिथल्याच शेजारच्या कॉटवरील एका माणसाला त्याने गळा दाबून मारले. त्याला स्मृति प्राप्त झाली नाही. ८० वर्षे होऊन नंतर तो वारला.

माझ्या आजीच्या घरात आणखी दोन व्यक्ती होत्या. एक अंकल रोलो व ऑंट ॲगाथा. दोघेही अविवाहित होते. रोलो काका इतके बुजरे, भिडस्त होते की त्यांना माणसांचा सहवास नको असे. मी लहान म्हणून माझ्याशी मात्र त्यांचे जमत असे त्यांच्या विनोद-बुद्धीचे एक उदाहरण सांगण्यासारखे आहे : मी त्यांना एकदा विचारले : "चर्चच्या खिडक्यांना रंगीत कांचा कांहो असतात ?" त्यांनी अगदी गंभीरपणे पुढील माहिती पुरविली– "पूर्वी चर्चच्या खिडक्यांना रंगीत काचा नसत. पण एकदा काय घडले की, पाद्रीमहाराज व्यासपीठावरून प्रवचन करीत असताना, त्यांनी खिडकीतून एक दृश्य पाहिले : एक मनुष्य पातळ पांढऱ्या रंगाने भरलेले पीप डोक्यावरून नेत रस्त्यातून चालत होता. एकाएकी त्या पिपाचा तळ निखळून पडला व पिपातील सारा पांढरा रंग त्या माणसाच्या सर्व अंगावर सांडला. ते पाहून पाद्री-बुवांना इतके काही अनावर हसू लोटले की, त्यांना प्रवचन चालू ठेवता येईना ! तेव्हापासून चर्चमधील खिडक्याना रंगीत काचा बसविण्याची पद्धति आली."

रोलो-काकांना हवामानशास्त्राची (मीटिऑरॉलजीची) चांगली माहिती होती. १८८३ साली क्रॅकॅटोआ ज्वालामुखी भडकला. त्याच्या स्फोटामुळे इंग्लंडमध्ये चमत्कारिक रंगाचे सूर्यास्त व निळा चंद्र असे चमत्कार दिसू लागले. रोलो-काका, ज्वालामुखीच्या स्फोटामुळे हे चमत्कार का दिसतात, याची शास्त्रीय प्रमाणे मला स्पष्ट करून सांगत असत. मी त्यांचे म्हणणे अगदी लक्ष लावून ऐकत असे. मला शास्त्रीय ज्ञानाबद्दल आवड निर्माण करायला रोलो काकांचे संभाषण खूप कारणी-भूत झाले.

ऑंट ॲगाथा हिचे लग्न एका ख्रिस्ती धर्मोपदेश-काशी ठरले होते. पण त्या सुमारास ॲगाथा आत्याला काही मनोविकृति होऊन कल्पित भास ('डिल्यूजन्स') व्हायला लागले. त्यामुळे त्यांचे लग्न मोडले. ती मोठ्या घरात रहात असली तरी एकाच खोलीत रहात असे. कारण काय तर, कोळसा फार जाळायला नको म्हणून. याच कारणामुळे ती आठवड्यातून एकदाच स्नान करीत असे. माझी तर अशी कल्पना आहे की आत्याला जडलेली मनोविकृति म्हणजे माझ्या आजीला सद्‌गुणांचे जे फाजील स्तोम माजवायचे व्यसन होते त्याचे फळ होय. कामवासना ही दुष्ट भावना होय, हे जर आजीने तिच्या मनावर सारखे बिंबविले नसते, तर आत्या सुखी व यशस्वी झाली असती.

माझ्या बालपणांत कित्येक वेळा व्रात्यपणा, खोड-साळपणाही मी केलेला मला आठवतो. आमचे एक फॅमिली डॉक्टर होते. ते त्यांच्या बगींत बसून मोठ्या रुबाबाने येत असत. त्यांची बगी आमच्या पुढच्या दारी थांबे त्यांच्या बगीचा कोचमन ( गाडीवान् ) डोक्यावर एक मोठी भपकेबाज ऐटबाज टोपी– डॉक्टरांची प्रॅक्टिस किती जोरांत चालली आहे याची जाहिरात करणारी जणू निशाणीच–घालून तेथे बगींतच बसलेला असे. मी आमच्या बंगल्याच्या छपरावर चढून बगीत बसलेल्या त्या माणसाच्या टोपीवर कुजक्या–नासक्या गुलाबाच्या कळयांचे गटारात पडलेले पुंजके गोळा करून फेकीत असे ! ते कोठून पडले हे कळायच्या आधीच मी अदृश्य होत असे. कित्येक वेळा तर त्याची बगी तो हांकीत असताना, मी आड उभा राहून बर्फाचे गोळे फेकून मारीत असे. –आणखी एक माझा व्रात्यपणा असा : एखाद्या रविवारी,








पार्कमध्ये बरेच लोक जमत. मी पार्कच्या कडेवरील एका उंच झाडावर शेंड्यापर्यंत चढून बसत असे. मग एका फांदीवरून उलटा सुलटा लोंबत राहून ओरडत असे की, " अहो धावा ! पडलो ". खाली जमलेले लोक 'या मुलाला उतरवून घेऊन कसे वाचवावे' याचा गंभीरपणे खल करीत असलेला मला ऐकू येत असे. शेवटी काही निर्णय करून त्यांच्यापैकी काहीजण मला वाचवायच्या उद्योगाला लागणार तो मी अलगद पुन्हा फांदीवर चढून, शांतपणे उतरून खाली येई. झाडाच्या उंच फांदीला दोर बांधून त्याचा झोंका करायचा व त्यावर जे इतरांना साधत नसत असे खूप उंच, पूर्ण-वर्तुलाकार झोंके मध्ये न थांबता घेत रहायचे असा माझा नेहमीचा खाक्या असे.

## कौमार (adolescence)

बाल्यातून कौमारावस्थेत प्रवेश करीत असताना एकदम माझ्यात बदल होत गेला असल्याचे मला आठवते. गांवढळ, अशिष्ट, ग्राम्य शब्द वापरण्यात मला रस वाटू लागला. वडिलमंडळी ' अमके करू नको, अभद्र बोलू नको, झाडावर चढू नको ' असे सारखे बजावायची. ते, त्यांच्या परोक्ष, त्यांच्यापासून लपवून, मुद्दाम करायची मला संवय जडू लागली. अशा प्रकारे जडलेली, लपून एखादी गोष्ट करायची ऊर्मि अजूनही माझ्यामध्ये रेंगाळली आहे. अजूनही मी वाचीत असता कोणी खोलीमध्ये आले तर ते पुस्तक त्याच्यापासून लपवायचे, मी काय करतो, कोठे गेलो होतो हे सांगणे टाळायचे हें माझ्या पहिल्यांदा मनात येते; पण ही वेडी सवय आहे हे जाणून मोठा हिय्या करून मी त्यातून बाहेर पडलो आहे.

वयात येत असतांनाचे माझे कौमारावस्थेतील जीवन भावनात्मक आणि बौद्धिक दृष्ट्या आतल्या आत दडपलेले असे मी घालवीत होतो. माझ्या मनात काय धुमसत आहे, रसरसत आहे ते मी कोणालाही सांगत नसे. कामवासना, धर्म आणि गणित या तीन गोष्टींचा माझ्या मनाने मुख्यतः हव्यास धरला होता. कामवासना जागृत होऊन त्यायोगाने मी पीडलो जात असतानाच्या त्यावेळच्या आठवणी आजही मला दुःखदायक वाटतात. मित्राच्या नादी लागून एका तरुण मोलकरणीशी लगट करण्यापर्यंत माझी मजल गेली होती. परंतु त्या मोलकरणीनेच आम्हाला झिडकारले व मी त्या वाईट मार्गापासून बचावलो. कामवासनाजन्य हव्यासाच्या मनोविकृतीतून मी माझ्या आत्मपरीक्षणपर संवयीमुळे हळूहळू मुक्त झालो.

कामुकतेबरोबरच माझ्या मनांत दुसरीही एक भावना– आध्यात्मिक व काव्यमय अशी उत्कटपणे उसळत होती. सूर्यास्ताचे, मेघांचे, वसंत ऋतूतील वृक्ष-वनस्पतींचे सौंदर्य तन्मयतेने निहाळत बसणे हाही मला हव्यास किंवा शोक लागला होता. सृष्टिसौंदर्याशी तन्मय होण्याचा हा जो हव्यास, त्याच्या बुडाशी सत्य परिस्थिति टाळून कामुकतेचे उदात्तीकरण करण्याचा माझ्या अन्तर्मनाचा तो प्रयत्न असावा असे आज मला वाटते. मी काव्येही वाचावयास सुरुवात केली. टेनिसनचे ' इन मेमोरिअम' हे काव्य मला आवडले नाही. सोळा-सतरा वर्षाचा असताना मिल्टनची सर्व काव्ये, बायरन व शेक्सपिअर यांच्याही साहित्याचा बराच भाग मी वाचून काढला. शेलेच्या काव्याचे दर्शन मला अगदी अभावितपणे घडून आले : मी एकदा माझ्या आत्याच्या दिवाणखान्यात तिची वाट पहात बसलो होतो. तेथे शेलेचा काव्यसंग्रह पडला होता तो उचलून त्यातले जे एक पान उघडले, त्या पानावर मला त्याचे ' अॅलॅस्टार ' हे काव्य दिसले. ते मी वाचायला लागलो व अगदी रमून गेलो. त्यातील कल्पित वातावरणाने मला मोहिनी घातली. पुढे मी मला भेटलेल्या प्रौढांना 'तुम्हाला शेले कसा काय वाटतो ? तो महाकवी आहे का ? ' असे विचारले. पण त्यांनी सर्वांनी नाक मुरडले. पण या योगाने मी न बिच-कता, शेलेची सर्व काव्ये वाचून काढली व पाठही केली. शेलेबद्दल काय वाटते, असे बोलण्याला मला कोणीही समानधर्मा न मिळाल्यामुळे, मी मनाशी कल्पना करीत बसे की, शेले किंवा शेलेइतकाच जिवंत भावनांचा मनुष्य जर आपल्याला भेटला तर किती छान होईल !

काव्याबरोबरच धर्म व तत्त्वज्ञान यांचाही मी मोठ्या उत्कटतेने विचार करीत होतो. परमेश्वर आहे, मनु-ष्याला इच्छा-स्वातंत्र्य ( फ्रीडम ) आहे, तो अमर आहे यांवरील माझा विश्वास डळमळू लागला. पंधराव्याच वर्षी मला असे वाटू लागले की,

"कसले आले आहे इच्छास्वातंत्र्य ? सर्व-सजीव वा निर्जीव– सृष्टीतील व्यापार गतिशास्त्राच्या (Dynamics) नियमाने बद्ध आहेत आणि मानवी इच्छेला वा संकल्पाला तसे स्वातंत्र्य व प्रभुत्व नाही." माझ्या मनात येणारे हे विचार मी एका नोटबुकात ग्रीक लिपीत लिहून ठेवीत असे. ग्रीक लिपीत अशा करिता की, ते कोणाला कळू नयेत. "मानवी शरीर हे एक यंत्र पण त्याबरोबरच त्यात ज्ञान किंवा जाणीव ('कान्शसनेस') ही निर्विवाद आहे. म्हणून शुद्ध जडवाद अशक्य होय" अशा निर्णयाला मी आलो होतो : सृष्टीचे 'पहिले कारण' म्हणून परमेश्वर असावा असे मी मानीत होतो. परंतु वयाच्या १८ व्या वर्षी, मिलचे आत्मचरित्र वाचीत असतांना, मला त्यात पुढील विधान आढळून आले; "मला कोणी निर्माण केले' या प्रश्नाचे उत्तर समाधानकारक रीतीनें मिळत नाही. कारण, त्यातूनच पुढचा प्रश्न उत्पन्न होतो की, परमेश्वराला तरी कोणी उत्पन्न केले ?" हे वाचून माझी परमेश्वराच्या अस्तित्वावरील श्रद्धा ढळली.

या काळात मी खूप, आधाशासारखे वाचीत असे. डांटे व मॅकिऑव्हेली यांचे ग्रंथ मूळांतून वाचण्याइतके इटालिअन मला येत होते. मिल, कार्लाइल, गिबन यांचे ग्रंथही मी वाचून काढले.– हे माझे सर्व भावना-विषयक व बौद्धिक जीवन आतल्या आत खोल दडून, दडपलेले असे चालू होते. बाहेर ज्यांच्याशी माझा संपर्क येत असे अशा लोकांना त्याची कल्पनाही नव्हती. समाजात वागताना मी अर्थातच सभ्य व सत्प्रवृत्त असाच वागत होतो, तरीपण माझ्या वागण्यात एक तऱ्हेचा बुजरेपणा, पोरकटपणा, वेंधळेपणा होता. याची मला जाणीव होती. माझ्याबरोबरीचे युवक स्त्रियांशी कसे मोकळेपणाने वागत हे मी पहात असे व मला त्यांचा हेवा वाटत असे. मला तर असे वाटे की, एखादी स्त्री जर आपणास आवडली तर तिला आपण आवडू असे वागणे आपणास कधी जमणारच नाही. मधूनमधून माझ्या घरी येणाऱ्या शिक्षकांशी माझे विचार बोलून दाखविण्याचा मी प्रयत्न करी. माझे शिक्षण १६ व्या वर्षापर्यंत घरीच झाले. शिक्षक दर तीन महिन्यांनी बदलत. याचे कारण असे असावे की, मी व माझे शिक्षक संगनमत करून परंपरागत धर्माशी विरोधी असें अभ्यास–वाचन करीत असू अशी माझ्या पालकांना शंका येई.

१६ व्या वर्षाच्या सुमारास मला एका सैनिकांना शिक्षण देणाऱ्या शिक्षकाकडे पाठविण्यात आले. मला अर्थात् सैन्यात शिरायचे नव्हते, पण केंब्रिज येथील स्कालर्शिप परीक्षेकरिता मला बसायचे होते, त्याकरिता ही योजना करण्यात आली. माझे सर्व सहाध्यायी पुढे सैन्यात जाणारे म्हणून त्या दृष्टीने शिकावयास आले होते. ते माझ्यापेक्षा २।३ वर्षांनी मोठेच होते. त्यांच्या खाजगी गप्पांचे विषय कामुक गोष्टी, वेश्यागमन इत्यादि होते. त्यांच्यातला एक जण बढाई मारून आपल्याला 'उपदंश' रोग झाला होता, हे सांगत असे व दुसरे ते कौतुकाने ऐकत – माझ्या मनाचा एक कप्पा प्रबल कामवासनेने जरी ग्रस्त असला तरी या अशांच्या संगतीत त्याचे पाशवी हिडीस रूप बघून मला अगदी किळस आला. मी माझ्या मनाशी पक्के ठरविले की आपण आपले विचार शुद्ध, कामवासनामुक्त ठेविले पाहिजेत व शुद्ध प्रेमाशिवाय नुसती कामुक वासनातृप्ति म्हणजे पशुतुल्य वर्तन होय. या विचारामुळे मी सहाध्यायांशी मिसळत नसे व एकटाच रहात असे. पण त्यामुळे त्यांना मला डिवचायला व चिडवायला संधीच मिळाली. टेबलावर खुर्ची ठेवून त्या खुर्चीवर मला बसवून, ते काही अश्लील गाणे म्हणून मला चिडवीत. मला कळून चुकले, की यांच्या तावडीतून सुटायचे असेल तर आपण चिडायचे नाही, शांतपणे सर्व हंसण्यावारी न्यायचे. असे एक टर्म गेले : दुसऱ्या टर्ममध्ये एक आणखी मुलगा आला. तो चिडखोर होता. तेव्हा माझे सहाध्यायी त्याच्या पाठीमागे लागले व मी सुटलो. तरीपण मनातून मी अत्यंत अस्वस्थ होतो. जवळच असलेल्या पायवाटेने मी शेतातून सूर्यास्ताची शोभा पहायला म्हणून एकटाच हिंडत असे. माझ्या मनात आत्महत्येचे विचार येत. पण गणिताचा आपण अभ्यास केला पाहिजे हे विचार बलवत्तर होऊन आत्महत्येच्या विचारापासून मी परावृत्त होई. माझ्या घरच्या लोकांना मी कोणत्या वातावरणांत होतो याची कल्पनाही नव्हती. शेवटीं १॥ वर्षानंतर १८८९ च्या डिसेंबरमध्ये माझी परीक्षा झाली व मला छोटी स्कॉलर्शिप मिळाली. पुढे








केंब्रिजला जाऊन प्रवेश मिळवायला दहा महिने होते. म्हणून या अवधींत मी घरी परत आलो.

वर उल्लेखिलेल्या सैनिकांच्या शाळेत मी शिकत असताना, शेवटी शेवटी एड्वर्ड फिट्झजेराल्ड नांवाचा एक माझा मित्र झाला होता तो. आळशी व थोडा अहंमन्य असला तरी त्याची गणितात विशेष चांगली गति होती. त्याच्याजवळ पुस्तकांच्या प्रथमावृत्त्यांच्या प्रतींची एक सुंदर लायब्ररी होती. पर्वतारोहण हा त्याचा मोठा छंद होता. सुट्टीत मधून मधून मी त्याच्या घरी जात असे. एकदा तर त्याच्याबरोबर इंग्लंडच्या बाहेर जायला मला परवानगी मिळाली. १८८९ मध्ये त्याच्याबरोबर मी पहिल्यांदा इंग्लंड सोडून असा बाहेर पॅरिसला गेलो. आयफेल टॉवर त्यावेळेला नुकताच बांधून झाला होता. त्यावर आम्ही चढून गेलो. पुढे आम्ही स्विट्झर्लंडमध्ये गेलो व तेथील पर्वतराजी दोनदा चढून आलो. दोन्ही वेळा आम्ही बर्फाच्या वादळात सापडलो. हा अनुभव मला नवीन, रोमांचकारी असा होता. यानंतर लगेच फिटझजेराल्ड व माझ्यात थोडे वितुष्ट आले. एकदा तो आपल्या आईविषयी रागावून सांगत असता, तिच्याविषयीं उपमर्दकारक शब्द बोलला की मला भयंकर संताप आला. इतका की, मी त्याचा गळा दाबून त्याला ठारच मारणार होतो, पण तो पिवळा-निळा पडल्यावर मला दया येऊन त्याला मी सोडून दिले.

माझे आणि माझ्या कुटुंबीयांचे, राजकारण सोडले तर, कोणत्याच विषयात विचार जमत नव्हते. मी जेव्हा माझे विचार बोलून दाखवायचा प्रयत्न करी, त्या वेळीं ते नेहमी माझी टवाळी करीत. मला असे स्पष्टपणे वाटत होते की, मानवजातीचे सुख हेच आपल्या सर्व कर्मांचे उद्दिष्ट असले पाहिजे. पण आश्चर्य हे की हे उद्दिष्ट मान्य न करणाऱ्या विचारवंतांचाही एक वर्ग मला आढळून आला. मानवजातीचे सुख हेच उद्दिष्ट मानणाऱ्या मताला उपयुक्ततावाद असे म्हटले जाते, असे मला कळले. मी एकदा धाडस करून आजीला सांगितले की मी उपयुक्ततावादी आहे. तिने माझ्यासमोर उदाहरणादाखल अनेक नैतिक कर्माकर्मांची कोडी टाकून उपयुक्ततावादाने ती कशी सोडविता येत नाहीत हे पटवून माझी टवाळी उडविली. अर्थात् तिचे सर्व युक्तिवाद मला बौद्धिक दृष्ट्या बिलकूल मान्य झाले नाहीत. मला तत्त्वज्ञानाची आवड आहे असे पाहिल्यावर तीं नेहमी मला म्हणायची " What is mind? no matter; what is matter? never mind ". ही वाक्ये तिने मला वारंवार, कंटाळा येईपर्यंत ऐकविली आहेत. तत्त्वज्ञानाविषयी तिच्या मनात कायमची अढी होती. पुढील पंक्तीवरून तिची तत्त्वज्ञानाविषयींची वृत्ति सूचित होईल :

"O Science Metaphysical
And very very quizzical,
You only make this maze of life mazier,
For boasting to illuminate
Such riddles dark as Will and Fate
You muddle them to hazier and hazier
.. ....... ...
You know no more than I,
What is laughter, tear or sigh,
Or love, or hate, or anger, or compassion.
Metaphysics, then, adieu,
Without you I can do,
And think you'll be very soon out of fashion."

[ बा तत्त्वज्ञानशास्त्रा,

तू आहेस फार विक्षिप्त ! जीवनाचे गुंतागुंतीचे जाळे तू अधिकच गुंतागुंतीचे करून टाकले आहेस.

मानवाचे इच्छास्वातंत्र्य व नियति हे आहेत मोठे कूट प्रश्न. 'या गूढ प्रश्नांवर मी प्रकाश टाकीन' अशी तुझी आहे फुशारकी. पण प्रत्यक्ष पहावे तो तू त्यात इतका गोंधळ माजविला आहेस की त्यांचे गूढ अधिकच वाढले आहे !

माणसाचे हसू, आसू, निश्वास, प्रेम, द्वेष, क्रोध, करुणा यांचा अर्थ जसा मला कळत नाही तसा तुलाही नाही.







तत्त्वज्ञानशास्त्रा, मग घेतो तुझा निरोप. तुझी मला काही गरज नाही. मला तर वाटते कीं, लवकरच तुला कोणी पुसणार नाही ! ]

मी मोठा झाल्यावर ती मला एकदा म्हणाल्याचे आठवते : " कारे ! मी ऐकलं की तू म्हणे एक ग्रंथ लिहीत आहेस ! " ही वाक्ये ती अशा हेटाळणीच्या स्वरात म्हणाली की जणू काय मला व्यभिचाराची संतति होणार होती ! माझा मोठा भाऊ बौद्ध झाला होता व मला सांगत असे की जीव इतका लहान आहे की तो अगदी लहानशा पाकिटातही राहू शकेल. बौद्धधर्माच्या गूढ स्वरूपाविषयी त्याने जे मला सांगितले त्यामुळे मला तरी काही बोध झाला नाही. विचारविनिमयाच्या दृष्टीने कोणीही समानधर्मा नसल्यामुळे, मला अगदी आतल्या आत गुदमरल्यासारखे वाटे. पुढे कधीकाळी आपणास आपले विचार ज्यांच्याजवळ बोलून दाखवू असे मित्र करता येतील, व आपले जीवन मोकळेपणाचे व स्नेहाचे सुख अनुभवू शकेल अशी मला आशा वाटेना. पण गणित विषयात काही महत्त्वाचे कार्य करून दाखवावे ही माझ्यातील खोल ऊर्मि अनिवार्यपणे सारखी उसळत होती, त्यामुळे मी खचून गेलो नाही.

**केंब्रिज : विद्यार्थिजीवन**

मी पहिल्यांदा डिसेंबर १८८९ मध्ये केंब्रिजला तेथे प्रवेश मिळविण्याकरिता म्हणून जी स्कालर्शिप परीक्षा असे तिला बसण्याकरता गेलो. इतरांबरोबर परीक्षेला बसायचा माझा हा पहिलाच प्रसंग होता. म्हणून मला मनातून घाबरटपणा वाटत होता. मी परीक्षा उत्तीर्ण होऊन मला छोटी स्कालर्शिप मिळाली तेव्हा इतरांच्या तुलनेने आपणही बौद्धिक दृष्ट्या कमी नाही याची जाणीव होऊन मला आनंद झाला. मी केंब्रिजला पहिल्यांदा आलो तेव्हा किती भिडस्त, बुजरा होतो याची एक गोष्ट सांगण्यासारखी आहे. मी आल्यावर ज्या खोल्यामध्ये उतरलो तेथून मी दररोज सकाळी शौच-स्नान इत्यादींकरिता स्टेशनवर जात असे. उतरलेल्या निवासस्थानी स्नानगृह वगैरे कोठे आहे हे कोणाला विचारण्याचे मला धैर्य झाले नाही !

नंतर, मला रीतसर प्रवेश मिळाल्यावर ऑक्टोबर १८९० मध्ये केंब्रिज विद्यापीठात आलो तेव्हापासून माझ्या जीवनाला सुखद वळण लागले. तेथे रहात असलेले विद्यार्थी व शिक्षक यांचे माझे संबंध घनिष्ठ बनत गेले. मी तेथे गेल्यावर पहिल्याच आठवड्यात माझे बरेच सहाध्यायी मला मोठ्या अगत्याने भेटायला आले. याचे कारण मला पाठीमागून असे कळले : आमचे स्कालर्शिपपरीक्षेचे पेपर प्रो. व्हाइटहेड यांच्याकडे तपासायला होते. त्यांना माझा पेपर विशेष आवडला व ' या मुलाकडे विशेष लक्ष ठेवा ' असे त्यांनी मुद्दाम सांगून ठेवलेले तेथील मंडळीत प्रसृत झाले होते. असेही मी ऐकले की, माझ्यापेक्षा एका विद्यार्थ्याला त्या परीक्षेत जास्त मार्क मिळाले होते; तरीपण व्हाइटहेडनी त्या विद्यार्थ्याचा पेपर जाळून टाकून त्याच्यापेक्षा मीच जास्त खरा हुशार म्हणून माझीच शिफारस केली.

केंब्रिज येथील विद्यार्थिगृहातील वास्तव्यात माझे जे अनेक घनिष्ठ मित्र बनले त्यात एक क्रॉम्प्टन डेव्हिस नावाचा होता. त्याची व माझी दोस्ती जमून ती पुढे त्याच्या मृत्यूपर्यंत टिकून राहिली. त्याच्यामध्ये भावना, बुद्धि, विनोद, शहाणपण, प्रामाणिकपणा, लीनता, आणि ढोंगाबद्दलची चीड या गुणांचा इतका मधुर मिलाफ झाला होता की, तसा मला कोठे पहायला मिळाला नाही. माझ्या मनात जर भलतासलता विचार आला, तर क्रॉम्पटनला तो पसंत पडणार नाही या भावनेने मी त्या विचारापासून परावृत्त होई, इतके त्याचे माझ्यावर वजन होते. त्याची व माझी पहिली भेट झाली तिची आठवण सांगण्यासारखी आहे. कॉलेजच्या वाटोळ्या पायऱ्याच्या स्पायरल जिन्यावरून आम्ही दोघे जात असताना काही खूप अंधार असलेल्या पायऱ्यांवर आम्ही आलों व चाचपडू लागलो. त्या अंधारात क्रॉम्पटने ब्लेक कवीची ' Tyger, Tyger, burning bright ' ही कविता मोठ्याने म्हणून दाखविली. मी त्या वेळेपर्यंत ब्लेक कवीचे नावही ऐकले नव्हते. त्या अंधारात, त्या अर्थपूर्ण कवितेने माझ्यावर इतका परिणाम केला की, माझ्या डोळ्यापुढे अंधेरी आली व कसाबसा जिन्याच्या भिंतीचा आधार घेऊन उभा राहिलो. — क्रॉम्पटनच्या विनोदबुद्धीचे एक उदाहरण आठवते : आम्ही दोघे शहराबाहेर शेतातून फिरावयास निघालो होतो. फिरत असता, आम्ही एका शेतकऱ्याच्या








शेतातून अतिक्रमण करून जाऊ लागलो. शेतकरी रागाने लाल होऊन आमच्यामागे मोठमोठ्याने ओरडत आला. तो जवळ येऊन ओरडत असता क्रॉम्प्टनने आपल्या एका कानावर हात ठेवून त्याला अगदी शांतपणे म्हटले: "जरा थोडे आणखी मोठ्याने बोलाल का? मला ऐकू येत नाही हो!" हे ऐकून तो तावातावाने ओरडणारा शेतकरी एकदम नरम येऊन गप्पच बसला! – पुढे क्रॉम्प्टनने त्याच्या मरणाआधी काही दिवस आम्ही भेटलो असताना हीच गोष्ट मला त्या पूर्वप्रसंगाची आठवण म्हणून सांगितली; मात्र ती सांगताना त्याची बहिरेपणाची भूमिका त्याने माझ्यावर लादली. मी त्याला अडवून जेव्हा म्हटले की 'अरे, बहिरेपणाचे सोंग तू घेतले होतेस, मी नव्हे!' तेव्हा पुन्हा कितीवेळ तरी प्रांजळ स्नेहार्द्रतेने खट्याळपणे हसत राहिला. – क्रॉम्प्टन पुढे मोठा वकील व कायदेपंडित झाला. त्याच्या अशीलात–पक्षकारात–हिंदी संस्थानिक, वसाहती सरकारे, वरिष्ठ बँका यांसारखी बडी प्रस्थे होती. कायद्याच्या व्यापातून वेळ काढून क्रॉम्प्टनने तत्त्वज्ञानावर एक ग्रंथ लिहिला होता. पण तो एकदा रेल्वेगाडीत प्रवास करताना त्या ग्रंथाचे हस्तलिखित हरवले. पुन्हा त्याने लिहिण्याचा प्रयत्न केला. पण तो ग्रंथ पुन्हा लिहून पुरा होण्यापूर्वीच त्याच्या आयुष्याचा ग्रंथ समाप्त झाला. तो स्वतःचीच टवाळी करीत आपल्या योजिलेल्या ग्रंथाला 'pie-dish' म्हणत असे. इब्सेनच्या एका नाटकात एक म्हातारा असा दाखविला आहे की त्याची आयुष्यातील एकमेव महत्त्वाकांक्षा 'pie-dish' हे पक्वान्न तयार करावे अशी होती. क्रॉम्प्टनचा उल्लेख त्याला होता.

केंब्रिजला दुसरे एक माझे मित्र झाले ते मॅक्टॅगार्ट. ते तत्त्वज्ञानी म्हणून प्रसिद्ध असून हेगेलच्या तत्त्वज्ञानाचे कट्टे पुरस्कर्ते होते. माझी व त्यांची पहिल्यांदा भेट झाली, त्या वेळी ते मला माझ्यापेक्षाही भिडस्त आहेत असे आढळून आले. एकदा मी माझ्या खोलीत बसलो असताना माझ्या दारावर कोणीतरी 'टक् टक्' केले. मी आतून म्हटले: "कोण आहे ते आत या!" तरी कोणी आले नाही. मी आणखी मोठ्याने "आत या" असे म्हटले. मग दार उघडून मॅक्टॅगार्ट आले व दाराशीच असलेल्या पायपोसावर थबकून उभे राहिले. त्यांना पाहिल्याबरोबर मीही 'एवढा मोठा मनुष्य आपणाकडे आला' या जाणीवेने–कारण केंब्रिजला त्यांची थोर तत्त्वज्ञानी म्हणून ख्याति होती– मी गोंधळून गेलो व 'या बसा' म्हणायचे देखील मला सुचले नाही. अशा अवस्थेत किती तरी मिनिटे गेली असतील. शेवटी ते आत येऊन केव्हा बसले ते आठवत नाही– दोन-तीन वर्षे मॅक्टॅगार्टच्या छापेमुळे मीही हेगेलवादी होतो. पुढे १८९८ नंतर मॅक्टॅगार्टचे तत्त्वज्ञान मला मान्य होईनासे झाले. तरी पण आमचे स्नेहसंबंध पहिल्या युद्धाच्या आरंभापर्यंत टिकून होते. पुढे पहिले महायुद्ध सुरू झाल्यावर त्यांना माझी मते नापसंत असल्यामुळे त्यांनी मला त्यांच्याकडे येण्यासही बंदी केली. पुढे तर माझी केंब्रिज येथील लेक्चररशिप देखील काढून घेण्यात त्यांनी पुढाकार घेतला.

केंब्रिजमधील माझ्या ३ ऱ्या वर्षी माझी जी. ई. मूर याच्याशी ओळख झाली. प्रतिभाशाली बुद्धिमत्तेचा मनुष्य कसा असावा याचा माझ्या मनाशी कल्पिलेला आदर्श मूरमध्ये साकार झाला होता असे मला वाटले. दिसायला सुंदर व सडपातळ अंगयष्टि, प्रतिभेने चमकणारा चेहरा, व स्पिनोझासारखी तळमळणारी, भेदक प्रज्ञा आणि मनाचा अत्यंत निर्मळपणा हे गुण त्याच्या ठायी मला विशेषत्वाने दिसले. माझ्यासारखाच, मूरही मॅक्टॅगार्टच्या छापेखाली येऊन काही थोडा काळ हेगेलवादी होता. पण त्याने माझ्यापेक्षाही लवकरच हेगेलवाद झुगारून दिला. त्याच्याशी झालेल्या संभाषणातूनच मी कांट व हेगेल यांच्या मतांचा त्याग करायला प्रवृत्त झालो. मूर माझ्यापेक्षा दोन वर्षे लहानच होता. तरीपण माझा तत्त्वज्ञानविषयक दृष्टिकोन बनण्यास त्याचे विचार बऱ्याच अंशी कारणीभूत झाले. मूरच्या मित्रांची एक आवडती करमणूक म्हणजे ही होती: मूर आपली 'पाइप' शिलगाविण्याकरिता काडी ओढी; व तोंडाने तत्त्वज्ञानाच्या एखाद्या प्रश्नासंबंधी इतका बोलत राही की काडी जळत जाऊन त्याची बोटे पोळत; मग पुन्हा तो दुसरी काडी पेटवी; हा क्रम इतका वेळ चाले की, काड्यांची पेटी सबंध खलास होऊन जाई. ही त्याची खोडी त्याच्या आरोग्याच्या दृष्टीने चांगलीच होती, कारण तेवढा वेळ तरी त्याचे तंबाखू ओढणे बंद पडे!

केंब्रिजला आमची एक 'सोसायटी' होती. तिची स्थापना १८२० साली झाली होती. तिचे विद्यार्थी व








शिक्षक सभासद असून तिच्या बैठकीतून तत्त्वज्ञान-विषयक चर्चा चाले. याच 'सोसायटी'च्या एका बैठकीत मूरच्या उत्कृष्ट दर्जाच्या बुद्धिमत्तेचे मला प्रथम दर्शन झाले. त्याने जो निबंध वाचून दाखविला त्याचा आरंभ असा असलेला मला आठवतो: "सृष्टीच्या आरंभी 'मॅटर' होती. 'मॅटर'ने 'डेव्हिल'ला जन्म दिला. व या 'डेव्हिल' पासून 'गॉड' उत्पन्न झाला." त्या निबंधाचा शेवट असा होता: "पहिल्यांदा 'गॉड'चा अंत झाला. नंतर 'डेव्हिल'चा. शेवटी 'मॅटर' तेवढी राहिली."

या 'सोसायटी'चे व्हाइटहेडही सभासद होते. त्यांनी माझ्या स्कालर्शिप परीक्षेच्या पेपर्सची प्रशंसा करून माझ्याकडे सदस्यांचे लक्ष वेधले होते. या 'सोसायटी'मुळेच माझी, ज्यांची ओळख व्हायला पाहिजे होती, अशा हुशार मोठ्या व्यक्तींशी ओळख झाली. 'सोसायटी'मध्ये वाद-विवाद, चर्चा, संभाषणे मोठ्या दिलखुलासपणे चालत. कोणत्याही विषयाबद्दल विधिनिषेध नव्हता. बैठकी रात्री १ वाजेपर्यंत चालत. त्यानंतर, मला आठवते, आम्ही कित्येकजण गप्पा मारीत हिंडत असू. बौद्धिक प्रामाणिकपणा हा या वादविवादांचा तसाच केंब्रिज-मधील बौद्धिक वातावरणाचा विशेष गुण होता. — माझी 'सोसायटी'चा सभासद म्हणून निवड १८९२ साली झाली, सभासद आपापल्या बोलण्यातून व पत्र-व्यवहारातून तत्त्वज्ञानविषयक परिभाषेत 'सोसायटी'-विषयी गंमतीने उल्लेख करीत: 'सोसायटी' हेच एक परम सत्य ( World of Reality ); बाकी सर्व आभास ( Appearance ). 'सोसायटी'चे जे सभासद नसत ते इंद्रियगोचर पसारा ( Phenomena ) असे. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीप्रमाणे 'दिक्' व 'काल' ( Space and Time ) हे असत्य होत. म्हणून 'सोसायटी'चे सभासद हे दिक्कालांच्या बंधनापासून मुक्त समजले जात— या 'सोसायटी'मुळे माझा केंब्रिजचा काळ आनंदात गेला. रविवारी, न्याहारी उशीरा करून दुपारच्या जेवणा-पर्यंत कोठेंतरी बाहेर हिंडून येणे असा आमचा प्रघात होता. मी खूप हिंडत असे. केंब्रिजभोंवतालच्या दहा मैल परिसरांतील प्रत्येक रस्ता न् रस्ता, मला चांगला परिचित होता. कित्येक चांदण्या रात्रीही मी बाहेर माळावर विलक्षण छांदिष्टपणाच्या नादात येऊन हिंडण्यात घालविल्या आहेत. ही जी छांदिष्टपणाची लहर मला येत असे तिचे मूळ 'कामवासने'त असावे असे मला-आज, तिचे विश्लेषण करीत असता, वाटते.

केंब्रिजचे महत्त्व माझ्या आयुष्यात दोन कारणांमुळे आहे: एक, मला मित्र मिळाले; दुसरे म्हणजे, बौद्धिक वादविवाद व विचारविनिमय यांचा मला नवीन अनुभव मिळाला. मात्र अध्यापकांकडून जे प्रत्यक्ष शिक्षण मिळाले त्यात नवीन लाभ मला काही झाला नाही. तत्त्वज्ञान तेथे मी जे शिकलो ते मला पुढे चुकीचेच वाटले. व पुढे विचारांच्या त्या चुकीच्या चाकोरीतून बाहेर पडावयास मला कित्येक वर्षे लागली. गणितात जे मला नवीन व्हायला पाहिजे होते, ते मला केंब्रिज सोडल्यानंतरच पहायला व करायला मिळाले.

## प्रेम आणि विवाह

१८८९ च्या उन्हाळयात मी आमच्या रोलो-काकांच्या घरी रहात असताना, एका रविवारी त्यांच्याबरोबर फिरत फिरत लांब गेलो असताना, ते म्हणाले: "येथून जवळच अंतरावर एक नवीन अमेरिकन कुटुंब रहायला आले आहे. त्यांना आपण भेटू या." माझ्या भिडस्त स्वभावानुसार मी आढेवेढे घेत त्यांना म्हणालो: "जाऊ या, पण आपण तेथे जेवणा-करिता थांबणार नाही हं!" त्यांनी त्या वेळेपुरते 'हो' म्हटले. आम्ही त्याप्रमाणे त्या घरी गेलो व शेवटी जेवणाच्या वेळेपर्यंत राहिलोच. आणि ते बरेच झाले! त्या अमेरिकन कुटुंबाचे नाव स्मिथ असे असून त्यात वडील, आई, त्यांची एक विवाहित मुलगी व जावई, एक इंग्लंडमध्ये कॉलेजमध्ये शिकणारा मुलगा आणि एक अविवाहित मुलगी जी अमेरिकेत शिकत असून सुट्टीमध्ये आईबापांकडे आली होती, अशी मंडळी होती. ह्या मुलीचे नाव ॲलिस ( Alys ) असून तिने माझे पहाताक्षणीच लक्ष वेधून घेतले. दिसायला ती सुंदर असून, तिच्यात एक प्रकारचा राणीचा रुबाब होता. ती प्रांजळ, धीट, व पूर्वग्रहापासून अलिप्त अशा मोकळेपणाने विचार करणारी असावी अशी तिच्याशी बोलताना माझ्यावर छाप पडली. तिची व वाल्ट व्हिट्मनची मैत्री आहे असेही तिच्या बोलण्यावरून मला समजले. तिने बोलता बोलता, "तुम्ही एक








जर्मन पुस्तक ' एक्केहार्ड ' नावाचे वाचले आहे का ? " असे मला विचारले. कर्मधर्मसंयोग असा की, ते पुस्तक त्याच दिवशी सकाळी मी पुरे केले होते. मला या योगायोगाचे खूप कौतुक वाटले. तिच्या मोकळेपणामुळे, माझा लाजाळूपणा कमी झाला. तिच्यावर माझे प्रथमदर्शनीच प्रेम बसले. – नंतर पुढे केंब्रिजहून दर सुट्टीत मी रोलो काकांकडे आल्यावर, तेथून दर रविवारी चार मैल अंतर चालत जाऊन, स्मिथकुटुंबात दुपारी जेवायला येत असे व सबंध दिवस राहून रात्रीचे जेवण करून परत जात असे. स्मिथ कुटुंबीय मंडळी क्केकर पंथाची असून, अमेरिकन स्वभावात जो एक प्रकारचा मोकळेपणा व माणुसकीचा जिव्हाळा असतो तो त्यांच्यात होता. परंपरागत रूढी, खोटा दिखाऊ संभावितपणा वा शिष्टपणा यापासून ती मंडळी मुक्त होती. ह्यामुळे मी त्यांच्यात समरसून जाऊ लागलो. ॲलिसवर मी अधिकाधिक अनुरक्त होऊ लागलो. ती माझ्यापेक्षा पाच वर्षांनी मोठी होती. कायद्याच्या दृष्टीने मी वयाने लग्नयोग्य होईपर्यंत ती अविवाहित रहाणे मला असंभाव्य वाटले. पण जर ती अविवाहित राहिली, तर मी मनाशी असा निश्चय केला की तिला आपण रीतसर मागणी घालावी. त्याप्रमाणे मे १८९३ मध्ये मला २१ वर्षे पूर्ण झाली. ॲलिस तोपर्यंत अविवाहित होती. तिचा व माझ्यातील जिव्हाळा गेल्या ३।४ वर्षांत वाढला होता. जून १८९३ मध्ये मला गणित विषयातील रँग्लर ट्रायपॉस मिळाला व कायदेशीर व आर्थिक दृष्ट्या आता मी स्वतंत्र बनलो. ॲलिस माझ्याकडे केंब्रिजला आपल्या एका नातेवाईकाला घेऊन आली. तिच्याशी माझ्या गप्पा होत असताना, घटस्फोट, विवाहबाह्य मुक्तप्रेम इत्यादि गोष्टींवर आमची चर्चा होत असे. तिची मते या प्रश्नांवर पुरोगामी असून मला तिचे कौतुक वाटले. पुढे १३ सेप्टेंबर १८९३ ला मी तिच्या घरी जाऊन दोन दिवस राहिलो. सकाळी आम्ही दोघे बाहेर फिरावयास गेलो, व एका टेकडीवर झाडांच्या खाली जाऊन बसलो. ते उंचावरील वृक्षाच्छादित सुंदर स्थान एखाद्या चर्चसारखे वाटले. त्या सुंदर सकाळी, ॲलिसच्या सांनिध्यात, मानवाच्या जीवनात सुख अशी काही चीज असू शकते याचा मला अनुभव आला. त्या वेळच्या शिष्टसंकेताप्रमाणे तिला आपण विवाहाची स्पष्ट मागणी घालावी असे जोराने माझ्या मनात आले. पण भिडस्तपणा आड येई. शेवटी एकदा हिय्या करून माझी मागणी तिला बोलून दाखविली. तिने ' हो ' किंवा ' नाही ' काहीच स्पष्ट सांगितले नाही. त्यावेळी आम्ही ठरविले की, काही काळ जाऊ द्यावा व मग नक्की ठरवावे. हे सर्व आमचे बाहेर उघड्यावरच चालले होते. घरी जो आम्ही जेवायला परत आलो, तो तिला एक अमेरिकेहून पत्र येऊन पडले होते. त्या पत्रात तिला " चिकॅगो येथील जागतिक प्रदर्शनाच्या मेळाव्यात तू दारूबंदीचा प्रचार करण्याकरिता निघून ये " असे लिहिले होते. हे निमंत्रण वाचून ॲलिसला खूप आनंद झाला. कारण संपूर्ण दारूबंदी-धोरणाची ती कडवी पुरस्कर्ती होती. तिने ते पत्र मोठ्या अभिमानाने मोठ्याने वाचून दाखविले व अमेरिकेला आपण जाणार असे तिने सांगितले. तिचा व आपला आता काही काळ तरी वियोग होणार यामुळे मी खट्टू झालो. पण तिचा तो ध्येयवादी उत्साह पाहून माझें स्वार्थी मन ओशाळलें.

अर्थात् ॲलिसने नकार दिला नसल्यामुळे मी तिची आशा सोडली नव्हती, तिच्याशी विवाह करण्याचा माझा निश्चय कायम होता. मी माझ्या घरच्या लोकांना –आजीला माझा मनोदय सांगितला. त्यांनी मला अपेक्षेप्रमाणे, आपल्या परंपरागत मतानुसार मला या विवाहापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. " ती मुलगी सुसंस्कृत नाही, खालच्या वर्गातील आहे, तुझ्यासारख्या अननुभवी तरुण गाठून तुला त्याने आपल्या जाळयात पकडला आहे, तिच्यासारख्या गावढळ मुलीशी लग्न होऊन तुझे हसे होईल " इत्यादि गोष्टी मला ऐकाव्या लागल्या. पण मला आता माझ्या वडिलांपासून सुमारे २०००० पौंडांची संपत्ति मिळालेली असल्यामुळे मी आता स्वतंत्र होतो. मी घरच्या मंडळींच्या म्हणण्याकडे लक्ष दिले नाही. त्यामुळे लग्न होईपर्यंत त्यांचे व माझे संबंध दुरावले.

याच वेळी मी रोजनिशी लिहीत असे व ती कुलुपात ठेवीत असे. या रोजनिशीत ॲलिसविषयी माझी जी आजीशी बोलणी होत असत, ती मी लिहून ठेवीत असे. योगायोग असा की, याच सुमारास माझ्या हाती माझ्या वडिलांची रोजनिशी लागली.










मला ती रोजनिशी वाचून असे आढळून आले की, ज्या वयात मी ॲलिसला लग्नाची मागणी घातली, अगदी त्याच वयात माझ्या वडिलांनी माझ्या आईला मागणी घातली होती; त्या वेळीही माझ्या आजीने, जे आज ती मला म्हणत आहे, तेच वडिलांना म्हणाली होती, आणि मी आज जसे माझे आजीला विरोध करणारे विचार रोजनिशीत लिहून ठेवले आहेत, अगदी तसेच विचार वडिलांनीही आपल्या रोजनिशीत लिहून ठेविले होते! हा योगायोग पाहून, माझ्या मनात अशी विलक्षण भावना उसळली की, मी माझे स्वतःचे जीवन जगत नसून, पुन्हा माझ्या वडिलांचेच जीवन जगत आहे. व आनुवंशिकतेविषयी माझ्या मनात भलतीच भोळी श्रद्धा उत्पन्न झाली. माझ्या मनात ॲलिसविषयी प्रेमभावनेची ओढ विलक्षण होती. पण शारीरिक संबंधाचे आकर्षण जागृत मनात तरी नव्हते. एका रात्री कामुक स्वप्न पडले पण जागा झाल्यावर प्रेमाचा पावित्र्यभंग झाला अशी जाणीव होऊन मला खंत वाटली.

लवकरच ॲलिस अमेरिकेहून परत आली व तिच्या माझ्या भेटी पुन्हा सुरू झाल्या. तिचे विवाहाबाबत विचार अजून दोलायमान स्थितीत होते. काही वेळा तिला जोराने वाटे, विवाह करावा; दुसऱ्या क्षणी वाटे, विवाहाने आपले स्वातंत्र्य गमावू नये. माझा इकडे अभ्यास जोराने चालूच होता. माझा अनुभव असा की, प्रेमातील आशा-निराशांच्या आंदोलनांनी माझ्या बौद्धिक एकाग्रतेत बिलकुल व्यत्यय येत नसे. मी 'मॉरल सायन्सेस ट्रॉयपास'ही लवकरच मिळविला. शेवटी एकदा ॲलिसने विवाह करण्यास आपली निश्चित संमति दिली. त्यानंतर, निराळीच अडचण उत्पन्न झाली; माझ्या घरच्या मंडळींना कळून चुकले होते की ॲलिसच्या कुलशीलावर शिंतोडे उडवून मला माझ्या निश्चयापासून ते परावृत्त करू शकत नव्हते. त्यांनी आमच्या विवाहाला 'खो' घालण्याचा अगदी निराळा आणि अगदी मूलगामी व्यूह रचला. आमचे फॅमिली डॉक्टर माझ्याकडे आले व त्यांनी आमच्या कुटुंबाच्या इतिहासाची कहाणी मला सांगितली. "तुझ्या एका काकांना वेड लागले होते. ॲगाथा आत्याबाईंना तर वेडाची लहर येऊन त्यांचे लग्न मोडले, तुझ्या वडिलांना सारख्या 'फिट्स' व 'फेपरे' येत होते. इत्यादि." त्या काळी शास्त्रीय विचार करणाऱ्या लोकांचा देखील आनुवंशिकतेविषयी एक धर्मभोळा दृष्टिकोन होता. मानसिक विकृती ह्या, प्रतिकूल परिस्थिति व अज्ञानाधिष्ठित नीतिकल्पना यांचा परिणाम होत, हे लोकांना एवढे स्पष्ट नव्हते वरील प्रकारे माहिती डॉक्टरकरवी मला सांगून, माझ्या घरच्या मंडळींनी आणली असा सल्ला दिला की आमची संतति मनोविकृत होण्याचा संभव आहे की काय या बाबत उत्तम वैद्यकीय सल्ला घ्यावा. आमच्याच फॅमिली डॉक्टरने, आमच्या घरच्या मंडळींच्या सांगण्यावरून, वैद्यकीय सल्ल्याचा आधीच शिजवलेला बनाव घडवून आणला व आम्हाला सांगितले की 'विवाह करा पण संतति होऊ देऊ नका!' हा निर्णय ऐकून मी व ॲलिस यांनी खूप विचार केला. मला मुले व्हावयास पाहिजे होती व डॉक्टरांच्या मतावरही माझी श्रद्धा होती. म्हणून लग्न करायचा विचार-रहित करावा असे माझ्या मनात आले. ॲलिसने सांगितले की, 'मुले व्हावी अशी तीव्र इच्छा मला नाही. आपण लग्न करू या!' शेवटी तिच्याशी चर्चा करून मीदेखील तिच्या मताला होकार दिला. व आम्ही जाहीरपणाने सांगितले की 'आम्ही लग्न करणार पण मुले होऊ देणार नाही!' त्या काळी संततिनियमनाची कल्पनाच लोकांना भयंकर वाटत होती. आम्ही संततिनियमन करणार हे म्हटल्याबरोबर आमच्या घरच्या कुटुंबात जो काही हलकल्लोळ माजला, हुंदके, रडारड झाली, त्या वातावरणात दिवस कंठणे मला जड जाऊ लागले. माझ्याही मनात भीतीचे वातावरण पसरले. आपल्या घराण्यातील आनुवंशिक मनोविकृतीने आपण स्वतःच तर पछाडले जाणार नाही ना अशी धास्ती माझ्या मनाने घेतली. २१ जुलै १८९३ ला ( – हा ॲलिसचा वाढदिवस होता हे पुढे मला कळले – ) मला स्वप्नात माझ्या आईला वेड लागले आहे असे दिसले. हा माझ्या मनाने घेतलेला धसका पुढे किती तरी दिवस अंतर्मनात घर करून होता. मला भयंकर स्वप्ने पडायची. कोणी वेड लागलेला मनुष्य माझा खून करायला आला आहे, मी ओरडतो-किंचाळतो आहे, माझी बायको मला मारायला उठली आहे म्हणून मी तिचा गळा दाबून खून करायला निघालो आहे

असे नानाप्रकार होऊन स्वप्नातून मी भेदरून जागा व्हायचा. पुढे माझे वैवाहिक जीवन सुखी झाल्यावर मला मानसिक स्थिरपणा येत गेला व जरी मधूनमधून भावनांचे काहूर उठे, तरी माझा मानसिक तोल सुटत नसे. मला वेड लागेल अशी जागृत मनाची भीती त्यामुळे कमी होत गेली हे खरे. अंतर्मनातील भीती मात्र कायमची गेली नाही.

जरी ॲलिस व मी यांनी विवाह करायचे ठरविले तरी मनात थोडा फार किंतु होताच. तो किंतुही एका दुसऱ्या डॉक्टरांच्या सल्ल्यामुळे दूर झाला. ते डॉक्टर म्हणाले : " संततिनियामक उपायांनी अनिष्ट परिणाम काहीही होत नाहीत. मीच स्वतः त्यांचा अनुभव घेतला आहे. म्हणून या कारणामुळे लग्न रहित करण्याचा मूर्खपणा करू नका." म्हणून आमचा लग्नाचा निश्चय पक्का झाला.

आमच्या लग्नासंबंधीच्या या वादावादी प्रकरणानंतर, मी ॲलिसच्या कुटुंबात रहावयास गेलो. व तेथे माझ्या पुढील अभ्यासाला आरंभ केला. केंब्रिजची फेलोशिप मिळविण्याकरिता एक प्रबंध सादर करावा लागत असे. प्रबंधाचा विषय ' नॉन-युक्लिडिअन जॉमेट्री ' असा मी घेतला व त्यावर काम करू लागलो. घरून माझ्यामागे मला लग्नापासून परावृत्त करण्याकरिता पत्रांचा ससेमिरा चालूच होता. अशाही परिस्थितीत ॲलिसच्या सांनिध्यामुळे माझे मानसिक धैर्य खचले नाही.

माझ्या आजीने आमच्या लग्नात ' खो ' घालण्याचा आणखी एक नवीनच उपद्व्याप आरंभला. पॅरिसला लार्ड डफरिन हे ब्रिटनचे वकील होते. त्यांच्या वकीलातीत मला जागा द्यायला तिने त्यांना उद्युक्त केले. आजीने मला आवर्जून पत्र लिहिले : " मी आता फार दिवस जगणार नाही. माझे आता फार थोडे दिवस राहिले आहेत. तू पॅरिस येथे वकीलातीतील जागा पतकर. ॲलिसपासून दूर गेलास तर तिने तुझ्या मनावर टाकलेली मोहाची भुरळ कमी होईल व तुलाच लग्न रहित करावेसे वाटेल. " हे पत्र वाचून ' आजी जर या धक्क्याने मरण पावली तर तो पश्चात्ताप आपणास व्हावयास नको ' अशा विचाराने मी पॅरिसला वकीलातीत काम करावयाचे कबूल केले. मात्र निक्षून बजावले की " मी तीन महिने तेथे राहीन. ॲलिसपासून दूर राहण्याच्या या अवधीत जर आमच्या मनात बदल झाला नाही, तर आमच्या विवाहात तुम्ही अडथळा आणता कामा नये. " त्याप्रमाणे मी पॅरिसला गेलो. मला ते काम बिलकूल आवडले नाही. व तीन महिन्यानंतर ॲलिसकडे परत आलो.

१३ डिसेंबर १८९४ रोजी ॲलिस व मी विवाहबद्ध झालो. तिचे कुटुंब क्वेकरपंथी असल्यामुळे, आमचे लग्न क्वेकर मीटिंगमध्येच झाले. ख्रिश्चन धर्माच्या तत्त्वांबद्दल व कर्मकांडाबद्दल माझी ॲलिसशी लग्नापूर्वी पुष्कळ चर्चा होत असे. लग्नानंतर तिचीही ख्रिश्चनधर्माविषयीची मते मी बदलू शकलो. ॲलिसची, इतर अमेरिकन स्त्रियांप्रमाणे, ज्या धार्मिक वातावरणात वाढ झाली होती, त्या वातावरणात कामवासना ही पाशवी समजली जात होती व पुरुष आपल्या पाशवी कामवासनेने विवाहाच्या सुखात विघ्न आणतात अशीही समजूत असे, तिची मते ह्याहिबाबत बदलू लागली.

आम्ही ठरविले होते की, लग्नानंतर परदेशी प्रवास करून तेथील स्थळे अवलोकन करायची. त्याप्रमाणे १८९५ च्या आरंभी तीन महिने आम्ही बर्लिनमध्ये होतो. याच काळात माझ्या बौद्धिक महत्त्वाकांक्षा साकार होत होत्या. आपण कोणताही धंदा किंवा नोकरी न करता लेखन करीत रहायचे असे मी ठरविले. बर्लिनमधील तेथील वास्तव्यात वसंत ऋतूतील तो एक संस्मरणीय दिवस मला आठवतो : तेथील ' टीएरगार्टन ' ( झू ) मधून मी एकटाच हिंडत होतो व मनाशी पुढील कामाविषयी योजना आखीत होतो. त्यावेळी माझ्या मनात असे आले की, आपण दोन प्रकारची पुस्तके लिहावी. एक पुस्तकमाला शुद्ध गणितापासून तो शरीरशास्त्रापर्यंतच्या विज्ञानांच्या तत्त्वज्ञानावर व दुसरी पुस्तकमाला सामाजिक प्रश्नावर. शेवटी या दोन्हीही पुस्तकमालांचा अंतिम मिलाफ शास्त्रीय व व्यवहार्य अशा समन्वयात व्हावा अशी मला आशा होती. ह्या योजनेची स्फूर्ति मला हेगेलच्या कल्पनातूनच पुष्कळशी मिळाली. हीच योजना पुढील उत्तरायुष्यात यथाशक्ती पार पाडण्याचा मी प्रयत्न करीत आलो आहे. पण ज्या दिवशी व ज्या क्षणी ही मी योजना आखली तो दिवस व क्षण माझ्या







आयुष्यात अत्यंत महत्त्वाचा व माझ्या आकांक्षाना मूर्त आकार देणारा ठरला यात शंका नाही. बर्लिनहून पुढे आम्ही इटलीला गेलो. इटली, वसंतऋतु आणि पहिले प्रेम यांचा असा एकत्र मिलाफ झाल्यावर, अत्यंत उदासात उदास मनुष्यदेखील सुखी होईल. मग आमच्या सुखाबद्दल काय विचारावे ?

माझा फेलोशिपकरिता लागणारा प्रबंध ऑगस्ट-पर्यंत पुरा करावयाचा होता. म्हणून याच काळात मी त्याच्यामागे लागलो. हा प्रबंध लिहिताना अत्यंत कठीण प्रकारचे मौलिक संशोधनकार्य किती जिकीरीचे असते याची मला कल्पना आली. प्रबंध पुरा झाल्यावर मला त्यावेळी तात्पुरते तरी वाटले की आपण भूमितीच्या बुडाशी असलेले मूल प्रश्न सोडविले. माझ्या प्रबंधाचा काही भाग गणितविषयक तर दुसरा भाग तत्त्वज्ञानात्मक होता. म्हणून माझा प्रबंध व्हाइटहेड व जेम्स वार्ड यांच्याकडे तपासावयास गेला. व्हाइटहेडनीं त्यावर जरा कडकच टीका केली व मला ती योग्यच वाटली. मला त्या टीकेवरून वाटले की, आपला प्रबंध भिकार असून, त्यानंतरच्या निकालाची वाट पहाण्यात अर्थ नाही. पण जेम्स वार्डनीं त्या प्रबंधाची मुक्तकंठाने प्रशंसा केली. दुसऱ्या दिवशी निकाल जाहीर होऊन मला कळले कीं, मी फेलो निवडलो गेलो आहे. त्यानंतर व्हाइटहेडनीं मला हसत हसत म्हटले, " तुझ्या कामात दोष काढण्याची ही शेवटची संधि होती. "

विवाहोत्तर माझी काही वर्षे अत्यंत सुखाची व कामाच्या दृष्टीने अत्यंत फलद्रूप झाली. भावनांचे द्वंद्व संपल्यामुळे, माझी सर्व शक्ति बौद्धिक कार्याकडेच लागली. आम्ही दोघेही मोठ्याने एकमेकाला पुस्तके वाचून दाखवीत असू. अशी आम्ही कितीतरी पुस्तके, मोठमोठे इतिहासाचे ग्रंथ संपविले. माझ्या पत्नीला खेडेगावात रहाणे आवडत नसे. परंतु माझ्या बौद्धिक कामाकरिता मी खेडेगावात रहावयाचा निश्चय केला होता व त्याप्रमाणे आम्ही वर्षातून सहा महिने तरी खेडोपाडी शांत जीवन कंठीत असू. तिच्याकरिता मीही मद्यपान सोडून दिले होते.

१८९५ च्या शरद्-ऋतूत आम्ही बर्लिनला जाऊन 'जर्मन सोशल डिमॉक्रसी'चा अभ्यास केला. त्या विषयावर मी १८९६ साली 'लंडन स्कूल ऑफ एकॉनॉमिक्स मध्ये व्याख्याने दिली व ती नंतर लगेच प्रसिद्ध झाली. त्या संस्थेचा अशा प्रकारचा मी पहिलाच व्याख्याता होतो. माझा फेलोशिपचा प्रबंध 'An Essay on the Foundations of Geometry' हा १८९७ साली प्रसिद्ध झाला. या पुस्तकाची फार प्रशंसा झाली. या पुस्तकाविषयी मला नंतर असे वाटू लागले की यातील विचारसरणी कांटच्या वळणा-वर बरीचशी गेली आहे. आणि हे एका अर्थी आरंभीच्या काळात माझ्या प्रतिष्ठेच्या दृष्टीने बरेच झाले. कारण विद्याव्यासंगी लोकात कांटवर टीका करणाऱ्यांना मान नव्हता.

१८९६ च्या शरदृतूत आम्ही अमेरिकेला गेलो. तिकडे जाण्यात माझा हेतु हा होता की ॲलिसच्या नातेवाईकमंडळींची अधिक ओळख व्हावी, तो हेतु सफळ झाला. त्या काळात अमेरिका हा देश मला भोळा-भाबडा निरागस वाटला. " ओस्कर वाइल्डने काय केले हो ? हल्ली त्याच्याविषयी फारसे ऐकू येत नाही. हल्ली तो कोठे असतो ? " असे मला पुष्कळ स्त्रीपुरुष विचारीत. मी उत्तर दिले : " तो तुरुंगात आहे. " माझे नशीब की, पुढे त्यांनी तुरुंगात तो का आहे हे विचारले नाही ! अमेरिकेतील विद्वान् मंडळींशी माझा जो संपर्क आला त्यावरून मला कळून चुकले की विद्याक्षेत्रात जर्मनी हा इंग्लंडपेक्षा वरचढ आहे. माझी जी कल्पना होती की, जेवढे काही ज्ञान असेल ते केंब्रिजमध्ये, ती माझी कल्पना माझ्या प्रवासा-मुळे विरून गेली.

माझ्या 'भूमितीची मूलतत्त्वे' या पुस्तकाची प्रशंसा करणारे पत्र मला लुई कौटुरट (Couturat) कडून आले याचा मला फार आनंद झाला. इतर देशांच्या विद्वानांकडून आपणास आपल्या कामाची गुणग्रहणपूर्वक प्रशंसापत्रे यावीत हे माझे एक तारुण्या-तील सुखस्वप्न होते. त्याची परिपूर्ति आज पहिल्यांदा घडून आली. कौटुरटला मी भेटायला गेलो व पुढे त्याची व माझी चांगली ओळख झाली. कौटुरटचा अत्यंत मूल्यवान् ग्रंथ म्हणजे त्याचा लाइबनिझच्या तर्कशास्त्रा-वरील ग्रंथ होय. लाइबनिझचे उत्तम लिखाण हस्तलिखि-ताच्या स्वरुपात अप्रकाशित असे पडून होते. कौटुर-टने ते पहिल्यांदा प्रकाशात आणले. मला कौटुरटच्या







पुस्तकाने फार आनंद झाला. कारण माझ्या पुढील ग्रंथात लाइबनिझच्या विचारसरणीची जी मी मांडणी केली होती तिला समर्थ लेखी पुरावा कौटुरटने पुरविला होता. मी अगदी अवचितपणे लाइबनिझचा अभ्यास करण्याकडे वळलो. मॅक्टॅगार्टना न्यूझीलंडला जायचे होते; तेव्हा त्यांच्याऐवजी मला लाइबनिझवर व्याख्याने देण्यास केंब्रिज येथील कॉलेजने पाचारण केले.— माझे लाइबनिझच्या तत्त्वज्ञानावरील पुस्तक १९०० साली प्रसिद्ध झाले.

## वेब-पतिपत्नी

सिडने वेबशी माझी पहिली भेट ॲलिसच्या घरी म्हणजे स्मिथ कुटुंबात झाली. सिडने व बीएट्रिस वेब या दोघा पतिपत्नींचा माझ्याशी घनिष्ठ परिचय बरीच वर्षे होता. वेब पतिपत्नीइतके संपूर्ण एकजीव झालेले वैवाहिक जीवन मी क्वचित पाहिले आहे. लग्नाविषयी काव्यमय किंवा अद्‌भुतरम्य दृष्टिकोन त्यांचा नव्हता. सहज नैसर्गिक वासना कायद्याच्या चौकटीत व्यवस्थित जीत बसू शकते अशी सामाजिक संस्था म्हणजे विवाह होय असे त्यांचे मत होते. बीएॅट्रिस वेब सिडनेचे एक विधान संभाषणातून नेहमी उद्‌धृत करीत असे : " सिडने म्हणतो की विवाह म्हणजे भावनांची कचरा-टोपली होय. " वेब पतिपत्नी आपल्या गुणांनी व कर्तबगारीने एकमेकास अगदी चपखल पूरक होती. मला तर असे वाटते की कोणतीही मूळ कल्पना बीॲट्रिसची व ती प्रत्यक्ष कृतीत उतरवावयाची हे सिडनेचे काम. वेबइतका उद्योगी मनुष्य माझ्या पाहाण्यात नाही. त्याच्या ' स्थानिक सरकार ' वरील पुस्तकाकरिता माहिती जमविण्यासाठी त्याने प्रचंड पत्रव्यवहार केला. त्याला रोज उत्तरे कमीत कमी एक हजार तरी येत असत. ही पत्रे आणून देणारा पोस्टमन स्वतः समाजवादी असल्यामुळे त्याला वेबविषयी आदर होता व ही वेबची पत्रे आणून देण्यात त्याला बहुमान वाटे; पण त्याबरोबरच हे पत्रांचे ओझे दररोज आणण्यास त्याच्या नाकी नऊ येत म्हणून तो नाखूष असे. वेब राज्यशास्त्र ही गोष्ट पवित्र मानीत असे व त्यातील विषयांवर थट्टा केलेली त्याला आवडत नसे. मी एकदा त्याला म्हटले : " लोकशाहीत एक मोठा गुण किंवा फायदा आहे. तो हा की, पार्लमेंटचा सभासद कितीही मूर्ख असला तरी, तो ज्यांनी त्याला निवडून दिले त्यांच्यापेक्षा मूर्ख असणार नाही; कारण जितका तो अधिक मूर्ख, तितके त्याला निवडणारेही तितकेच मूर्ख ! " वेब चिडून म्हणाला : " मला अशा तऱ्हेचा युक्तिवाद आवडत नाही. "— सिडनेकुटुंबाने संशोधन करून ती पुस्तके लिहिली ती त्यांच्या असीम उद्योगाची साक्ष होत. ' स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स्' ही संस्था सिड्नेच्या संयोजनकौशल्याची साक्ष होय.— एकदा मी बर्नार्ड शॉला म्हटले की, सिड्ने वेबच्या ठिकाणी कनवाळूपणा, दयाबुद्धि कमी आहे. त्यावर शॉने माझे म्हणणे चूक आहे असे म्हणून स्वतःच्या अनुभवाची पुढील गोष्ट सांगितली : "वेब आणि मी एकदा हॉलंडमध्ये ट्रामकारमधून प्रवास करीत असता पिशवीतली बिस्किटे घेऊन खात होतो. इतक्यात पोलिसांनी हातात बेड्या घातलेल्या एका कैद्याला ट्रामकारमध्ये आणले व बसविले. बाकीचे सगळे उतारू त्या कैद्यापासून दूर सरले परंतु वेबने कैद्याकडे जाऊन त्याला बिस्किटे दिली. "— बीॲट्रिस वेब यांना अंशतः आरोग्याच्या व अंशतः धार्मिक कारणाकरिता कमी खाण्याची, लंघन करायची सवय होती. ती न्याहारी करीतच नसे. मुख्य जेवण म्हणजे तिचे दुपारचे. त्यावेळी मात्र तिला इतकी भूक लागलेली असे की, सगळ्यांच्या आधी ती पुढे जाऊन खायला सुरुवात करी.— वेब पतिपत्नींचा स्वभाव लोकशाहीला पोषक नव्हता. त्यांचे मत असे होते की, मुत्सद्द्याचे काम म्हणजे लोकांना थापा मारून बनविणे किंवा त्यांच्यावर वचक बसवून काम करून घेणे. बीॲट्रिस नेहमी, आपले वडील कंपनीच्या शेअरहोल्डर्सची सभा कशी चालवीत, प्रत्येक शेअरहोल्डरला त्याच्या स्थानाची जाणीव देऊन कसें कह्यात ठेवीत, याचे वर्णन करीत असे. राज्यशासनाची कल्पना तिची तशीच होती. ती जी आपल्या वडिलांचे अनुभव सांगे त्यावरून तिला थोरामोठ्यांबद्दल विशेष आदरभाव नव्हता असे दिसून येई : तिच्या वडिलांनी क्रिमिआमध्ये फ्रेंच सैन्याकरिता हिवाळी झोपड्या बांधण्याचे कंत्राट घेतले होते. त्यांनी त्याप्रमाणे झोपड्या बांधून दिल्या व त्यांचे पैसे मागायला पॅरिसला सरकारकडे आले. सरकारातील प्रत्येक अधिकाऱ्याने त्यांचे देणे मान्य केले. पण प्रत्यक्ष रकमेचा चेक काही येईना.








तेव्हा एका थोर गृहस्थाने ' आधी मंत्र्याला ५० पौंड व त्याच्या हाताखालच्या प्रत्येकाला ५ पौंड द्या ' म्हणजे काम होईल असे सांगितले. पॉटरने ( बीॲट्रिसच्या वडिलांनी ) तसे केले व चेक दुसऱ्या दिवशी आला. – वेब पतिपत्नींचे काम म्हणजे ब्रिटिश समाजवादाला त्यांनी पाठीच्या कण्यासारखा आधार दिला. त्यांनी आपल्या विचारसरणीचा पुरस्कार करणाऱ्या बुद्धिवंतांच्या पिढ्या निर्माण केल्या. त्यांच्या या कार्याविना ब्रिटिश लेबरपक्ष आज जो अनेक आणीबाणीच्या प्रसंगातून निभावून टिकून राहिला आहे तो राहिला नसता, त्यात बेशिस्ती व बेदिली निर्माण झाली असती.

## व्हाइटहेड

व्हाइटहेडचे व माझे ऋणानुबंध फार जुने असले पाहिजेत. मी लहानपणी आजीकडे रहात असतांना कोणी तरी मला सांगितले की पृथ्वी वाटोळी आहे. माझा विश्वास बसेना. म्हणून तेथील पाद्री धर्मोपदेशकाला मला समजावून सांगण्याकरिता बोलाविले. योगायोग असा की, ते धर्मोपदेशक दुसरे तिसरे कोणी नसून व्हाइटहेडचे वडील होते. पुढे मी केंब्रिजच्या स्कालर्शिपपरीक्षेला बसलो असताना माझे परीक्षक व्हाइटहेडच होते हे मागे आलेच आहे. नंतर केंब्रिजला १८९० मध्ये त्यांच्या 'स्टॅटिक्स'च्या वर्गात मी एक विद्यार्थी होतो. त्यावेळी वर्गातला एक प्रसंग मला आठवतो : सर्व वर्गाला त्यांनी पाठ्यपुस्तकातील कलम ३५चा विशेष अभ्यास करण्यास सांगितले. पण माझ्याकडे तेवढे वळून म्हणाले : "तुला त्याचा अभ्यास करण्याची जरूरी नाही. तुला ते चांगले ठाऊक आहे." मी ते कलम १० महिन्यापूर्वी झालेल्या माझ्या स्कालर्शिपपरीक्षेच्या पेपरात सर्वच उद्धृतच केले होते. व्हाइटहेड यांच्या लक्षात ही गोष्ट असलेली बघून मला विस्मय वाटला व त्यांनी मला कायमचे स्नेहांकित करून ठेवले. पुढे तर त्यांचे व माझे, शिक्षक व शिष्य यासंबंधाचे रूपान्तर मैत्रीत झाले.

व्हाइटहेड हे आधी गणितज्ञ म्हणून नावाजलेले होते. पुढे ते अमेरिकेत गेल्यावर तत्त्वज्ञानी म्हणून नावारूपास आले. तत्त्वज्ञानाच्या बाबतीत त्यांचे–माझे जुळले नाही. पहिल्या युद्धाच्या वेळी माझी शांततावादी भूमिका त्यांना अगदी पसंत नव्हती. आमच्या परस्पर मतभेदात त्यांचे वागणे अत्यंत समजूतदार व सहिष्णुतेचे होते. आमच्या मैत्रीत थोडे पुढे न्यून आले असेल तर त्याचा दोष बराचसा माझ्याकडेच आहे. पहिल्या महायुद्धाच्या शेवटच्या महिन्यात व्हाइटहेड यांचा १८ वर्षांचा मुलगा ठार झाला. पुत्रमरणाचे दुःख त्यांना फार झाले. विश्व हे केवळ एक यंत्र आहे अशी आतापर्यंत त्यांनी मनाशी बाळगलेली उपपत्ति त्यांना या पुत्रवियोगामुळे असह्य वाटू लागली व आपले तिच्यातून सुटण्याकरिता व्हाइटहेड तत्त्वज्ञानाकडे वळले. तत्त्वज्ञान बनवीत असता त्यांच्यावर बर्गसनचा बराच परिणाम झाला. विश्वाला एकसूत्रीपणा आणणारे एक तत्त्व असले पाहिजे, व त्या तत्त्वाच्या अधिष्ठानावरच शास्त्रीय अनुमानाचे समर्थन होऊ शकते, असे व्हाइटहेड यांचे मत होते. माझ्या स्वभावाला व प्रवृत्तीला हे मत पटणारे नव्हते. आमच्यापैकी कोणाचा दृष्टिकोन बरोबर याचा निर्णय केवळ शुद्ध बुद्धिवादाच्या निकषावर लागू शकेल का नाही याबद्दल मला शंका वाटते. ज्यांना व्हाइटहेडचा तत्त्वज्ञानविषयक दृष्टिकोन आवडतो ते म्हणतील की ' व्हाइटहेडच्या तत्त्वज्ञानाने साध्या लोकाना शांति मिळू शकेल, तर रसेलच्या तत्त्वज्ञानाने तत्त्वज्ञानी लोकाची शांति नाहिशी होईल.' उलट ज्यांना माझा तत्त्वज्ञानविषयक दृष्टिकोन आवडतो ते म्हणतील की, "व्हाइटहेडच्या तत्त्वज्ञानावर तत्त्वज्ञानी खूप असतील, पण रसेलच्या तत्त्वज्ञानावर साधे लोक खूप आहेत."

व्हाइटहेड यांना अनेक विषयात रस होता. त्यांना इतिहासातील जी खडान्‌खडा माहिती होती त्यामुळे मी विस्मित होत असे. इतिहासाच्या कोणत्याही रूक्ष वाटणाऱ्या पुस्तकात त्यांचे मन रमत असे. त्यांच्या अंथरुणापाशी, निजताना सहज विरंगुळा म्हणून वाचायला त्यांनी घेतलेले ' History of the Council of Trent ' हे किचकट पुस्तक त्यांच्या अंथरुणावर उशीशी पाहून मला नवल वाटले. व्हाइटहेड अत्यंत नम्रवृत्तीचे होते. काम करीत असता त्यांची किती विलक्षण एकाग्रता होत असे याचे एक उदाहरण सांगण्यासारखे आहे : मी त्यांच्या घरी एकदा काही दिवस रहात असता, माझा मित्र कॉम्पटन आला व त्याला घेऊन मी व्हाइटहेड बागेत आपले लेखन करीत बसले होते, त्यांच्याकडे गेलो.







व्हाइटहेड गणिताचे लेखन करीत बसले होते. कॉम्टन व मी दोघेही त्यांच्यापासून एका यार्डा-वर उभे होतो. ते पानामागून पाने उलटीत गणित सोडवीत बसले होते. त्यांचे आमच्याकडे बिल-कूल लक्ष गेले नाही. थोडा वेळ वाट पाहून आम्ही स्तंभित होऊन परत गेलो.– समाजात वागत असताना व्हाइटहेड अगदी सौजन्यशील, विचारी आणि स्थितप्रज्ञासारखे शांत अविचल वाटत. पण तसे ते खरे नव्हते. 'संपूर्णतया बुद्धिवादी मनुष्य' म्हणजे अमानुष विकृत मनुष्य होय असे मी मानतो. तसे व्हाईटहेड संपूर्ण बुद्धिवादी कधीच नव्हते. अगदी शिस्तीने व संयमाने जीवन जगणारे लोक एकटे बसले असता स्वतः-शीच व्याकुळ होऊन जसे बडबडत असतात तसेच तेही बडबडत. भावनांच्या आवेगाने त्यांचाही तोल सुटल्यासारखा दिसे. असे कित्येक दिवस जात की ते कोणाशी बोलत नसत, अबोल बसून रहात. कित्येक वेळा स्वतःशीच काही तरी भलते-सलते अचकटविचकट बोलत : त्यामुळे त्यांच्या पत्नीला 'हे वेडे होतात की काय' याची सदैव भीति वाटे. व्हाइटहेड यांची आर्थिक परिस्थिति बरी नव्हती. ते केंब्रिज येथे दुका-नातून कर्जाऊ माल आणीत असत. बिल भरायला त्यांच्याजवळ पैसा नसे. त्यांची पत्नी, हे जास्तीच मनाला लावून घेतील, म्हणून खरी वस्तुस्थिति त्यांना सांगत नसे. माझ्याजवळ मात्र सगळ्या गोष्टी मोकळे-पणे सांगे. मी गुप्तपणे त्यांना द्रव्याची मदत करीत असे. गुप्तपणे अशाकरिता की, जर मी मदत करतो असे व्हाइटहेड यांना समजले तर त्यांना भयंकर अपमानास्पद वाटले असते. माझे 'प्रिन्सिपिआ मॅथिमॅटिका' त्यांच्या सहकार्याने पुरे व्हावयाचे होते. तेही सहकार्य त्यांच्याकडून मला मिळवावयाचे होते. इतकी ओढगस्त असली तरी, व्हाइटहेड यांचे काम तितक्याच जोराने चालू होते. मला त्यांच्याकडे पाहून असे वाटे की "हे भयंकर आत्मसंयमन करीत आहेत, आतल्या आत भावना फार दडपून ठेवीत आहेत, मानवी स्वभावाला हा ताण सहन होणे कठीण आहे; एखाद्या वेळेला हा ताण असह्य होऊन यांचा 'ब्रेकडाऊन' होईल!"

व्हाइटहेड यांच्यात व्यवहारदृष्ट्या मला एक वैगुण्य आढळून आले. मला एकदा काही गणितविषयक बाबतीत त्यांच्याकडून स्पष्टीकरण हवे होते. मी त्यांना पत्र पाठविले, त्याचे उत्तर त्यांच्याकडून आले नाही. नंतर तार केली, तरी उत्तर नाही. पुन्हा 'रिप्लाय पेड' तार केली तरीही उत्तर नाही. शेवटी मी स्वतःच त्यांना जाऊन भेटलो, व मला पाहिजे होते ते स्पष्टीकरण करून घेतले. पत्रोत्तर न पाठविण्याच्या बाबतीत त्यांचे समर्थन असे की, अशी उत्तरे पाठवीत बसलो, तर मला माझे मौलिक कार्य करायला वेळच मिळणार नाही! मला त्यांचे समर्थन समर्पक व निरुत्तर करणारे वाटले.– व्हाइटहेड हे शिक्षक या दृष्टीने आदर्श होते. विद्यार्थ्यांचे गुण-दोष, त्यांची कमीअधिक तयारी त्यांना हेरता येत असे. ते हेरून विद्यार्थ्याला आपा-पल्या शक्तीनुसार विकास करण्यास ते अगदी मोकळे-पणाने उत्तेजन देत असत. माझ्यासारखे इतर हुशार विद्यार्थी जे जे त्यांच्या सांनिध्यात आले, त्यांच्यात त्यांनी स्फूर्ति व खरे-खुरे कायमचे स्नेहबंधन निर्माण केले.

### 'प्रिन्सिपिआ मॅथिमॅटिका' :

### माझ्या बौद्धिक जीवनाचा उत्कर्षबिन्दु

१९०० च्या जुलैमध्ये पॅरिसला तत्त्वज्ञानाची आंतरराष्ट्रीय कॉंग्रेस भरली. तिला व्हाइटहेड व मी हजर राहिलो. ह्या कॉंग्रेसने माझ्या बौद्धिक जीवनाला अगदी निर्णायक वळण लावले. तेथे सुप्रसिद्ध गणितज्ञ पिॲनो याची माझी गाठ पडली. त्याचे काही लिखाण मी वाचले होते. त्याने गणितविषयक काही 'नोटेशन' शोधून काढले होते. ते मी मात्र चांगले अवगत करून घेतले नव्हते. कॉंग्रेसमध्ये पिॲनोचा खूपच प्रभाव पडलेला दिसून आला. त्याचे युक्तिवाद बिनतोड असत. त्याचे कारण मला वाटले की त्याचे 'मॅथि-मॅटिकल लॉजिक,' गणिती तर्कशास्त्र हे असावे. त्याचे व त्याच्या शिष्याचे सर्व लेख मी मिळविले आणि त्यांचा बारकाईने अभ्यास केला. त्यावरून, माझ्या गणितविषयक कामाकरिता मला जे पाहिजे होते ते तंत्र मला सांपडले, अशी माझी खात्री झाली. त्याप्रमाणे मी गणितावर काम करू लागलो. त्यावेळी मी व्हाईट-हेड यांचेकडे रहात होतो. त्यांना मी माझ्या कल्पना सांगत असे. व चर्चा होऊन, असे काही मुद्दे निघत की त्यांचा काही उलगडाच होत नसे. पण गंमत अशी








की सकाळी उठल्यावर त्या मुद्द्यांचे मला उत्तर सापडे. माझे अंतर्मन झोपेत त्यांची उत्तरे तयार करीत असावे. त्यामुळे मला अत्यंत आनंद होत असे. बौद्धिक हर्षाचा कैफ मला जणू त्यावेळी चढला होता. सर्वत्र धुके पसरले असताना डोंगर चढून जावे व एकदम डोंगरमाथ्यावर आल्यावर धुके वितळून जाऊन आजूबाजूचा विस्तीर्ण ४०–५० मैलांचा टापू लख्ख डोळ्यापुढे यावा त्याप्रमाणे हे गणितविषयक काम करताना मला अनुभव येत असे. कित्येक वर्षे मी गणिताच्या मूलभूत कल्पनांचे पृथक्करण करण्याची धडपड करीत होतो. त्या धडपडीनंतर गेल्या काही आठवड्यात मला निश्चित उत्तरे सांपडली असे वाटले. ही उत्तरे शोधतांना मी एक नवीन गणिती तंत्र अस्तित्वांत आणीत होतो. त्या तंत्रामुळे, पूर्वी जी ज्ञानक्षेत्रे आपली नव्हेत म्हणून तत्त्वज्ञान्यांच्या संदिग्ध विचारांकरिता शास्त्रज्ञांनी सोडून दिली होती, ती जणूं आपण त्यांच्या हातून जिंकून हस्तगत केली व ती निश्चित शास्त्रशुद्ध विचाराच्या कक्षेत आणली, असे मला वाटले. बौद्धिक दृष्ट्या, १९०० चा सेप्टेंबर महिना माझ्या आयुष्यातील परमोच्च बिन्दु होता. आपल्या हातून अत्यंत मोलाचे कार्य झाले आहे असे मला वाटू लागले. व त्या कृतार्थतेच्या भावनाकल्लोळात मी रस्त्यावरुन हिंडत असताना मला अशी भीति वाटे की, आपल्या डोक्यातील विचार आपण लिहून काढण्यापूर्वी आपण वाहनाखाली अपघातात सांपडून मरणार तर नाही ना ! शेवटी नियमितपणे रोज लिहून काढून मी माझ्या 'प्रिन्सिपल्स ऑफ मॅथिमॅटिक्स' या ग्रंथाचे हस्तलिखित डिसेंबर १९०० अखेर पुरे केले.

काय चमत्कारिक योगायोग कोणाला ठाऊक ! पण १९०१ वर्षात प्रवेश केल्यावर त्या वेळेपासून माझ्या जीवनात अशी काही बौद्धिक व भावनात्मक आंदोलने सुरू झाली की मी निराशेच्या निबिड अंधारात सापडून धक्के खाऊ लागलो. १९०१ च्या एप्रिलमध्ये आम्ही व्हाइटहेडच्या घरी रहात होतो. मिसेस व्हाइटहेड बऱ्याच आजारी होत्या. हृदयविकाराने त्यांना वेदना होत होत्या. आम्हाला त्यांची चिंता वाटत होती. पत्नी हा व्हाइटहेड यांच्या मनाला मोठा आधार होता. ती मेली तर त्यांच्याकडून पुढे काम होणे अशक्य होईल असे मला वाटले. एका दिवशी जवळच असलेल्या गावी, जिल्बर्ट मरे याच्याकडे मी व ॲलिस गेलो होतो. तेथे मरेने 'हिपोलिटस' या ग्रीक नाटकाचा त्याने स्वतः केलेला इंग्रजी अनुवाद वाचून दाखविला. मी तर त्या अनुवादातील काव्यसौंदर्याने हेलावून गेलो. आम्ही घरी परत आलो तो आम्हांला मिसेस् व्हाइटहेड विव्हळत असलेल्या दिसल्या. त्यांना भयंकर यातना होत होत्या. ते पाहून, मानवी जीव हा शेवटी किती असहाय, एकला आहे या जाणीवेने मी अगदी हादरून गेलो. अलीकडे लग्नानंतर मी सुखांत होतो. माझे भावनात्मक जीवन बरवर तरी शांत होते. या काळात मला जीवनांतील गंभीर समस्यांचा जणू विसर पडल्यासारखे झाले होते. पण आज मिसेस व्हाइटहेडच्या यातना पाहातांक्षणीच एकदम जणू माझ्या पायाखालची जमीनच हादरली. आणि मनाने मी अगदी निराळ्याच भूमिकेवर आरूढ झालो. त्या काही मिनिटांत माझ्या मनात जे विचार भराभर चमकून गेले ते असे : "मानवी आत्म्याचे एकलेपण व असहायपण किती असह्य आहे ? त्याचा ठाव घेऊ शकेल अशी एकच गोष्ट. ती म्हणजे आध्यात्मिक लोक जिचे वर्णन करतात ती परमावधीची उत्कट प्रेमभावना हीच होय. तिच्याशिवाय सर्व काही व्यर्थ व कष्टदायक. युद्ध हे अत्यंत अनिष्ट होय. बळाचा किंवा पाशवी शक्तीचा उपयोग निन्द्य होय. मानवामानवात प्रत्येकाने दुसऱ्याच्या अंतरंगातील एकलेपणाचा ठाव घेऊन त्याच्याशी सहानुभूतीने वागले पाहिजे. – " व्हाइटहेड यांचा धाकटा तीन वर्षाचा मुलगा तेथेच खोलीमध्ये होता. आतापर्यंत मी त्याच्याकडे किंवा त्याने माझ्याकडे कधी लक्ष दिले नव्हते. मला आता वाटले की, त्याच्या आईला सध्याच्या तिच्या स्थितीत त्याने त्रास देऊ नये म्हणून आपण काही केले पाहिजे. मी त्याचा हात धरला व बाहेर नेले. तोही माझ्याबरोबर आनंदाने आला व माझ्याशी घरच्यासारखे वागू लागला. तो पुढे १९१८ साली युद्धात ठार झाला. तोपर्यंत त्याचा-माझा लोभ कायम होता.– वर वर्णिलेले विचार माझ्या मनात काहीच मिनिटे येऊन गेले असतील. पण त्यामुळे मी अगदी पार बदलून गेलो. काही काळ तर, गूढवाद्याच्या








साक्षात्कारासारख्या अनुभूतीने माझे जीवन उजळून निघाले. रस्त्याने जाताना जो जो भेटेल त्याच्या अंतरंगांतले विचार मला जाणता येतील अशी भावना माझ्या ठिकाणी निर्माण झाली. अर्थात् ही भावना भ्रममूलक असावी असे मला वाटले. पण त्याबरोबरच हेही खरे की त्या वेळेपासून पूर्वीपेक्षा मला माझ्या मित्रांविषयी व परिचितांविषयी अधिक जिव्हाळा वाटू लागला. माझा आतापर्यंतचा अभ्यास व संशोधन व एकंदर सर्वच हव्यास पृथक्करण करण्याकडे, काही ठाम शोधून काढण्याकडे होता पण ते बदलून माझ्यामध्ये आध्यात्मिक गूढवाद्याप्रमाणे भावना तरळू लागल्या. सौन्दर्याशी तादात्म्याची अनुभूती प्राप्त करून घ्यावी, लहान मुलांवर उत्कट प्रेम करावे, मानवी जीवन सुसह्य करण्याकरिता बुद्धाने जसे तत्त्वज्ञान शोधून काढले तसे आपण काही करावे, अशा प्रबळ ऊर्मी माझ्यामध्ये उसळू लागल्या. मी त्या वेळी खूप प्रक्षुब्ध, व व्याकुळ झालो असलो तरीही माझ्यात अशी एक जाणीव होती की, या व्याकुळतेवर आपण विजय मिळवू शकतो. उलट या व्याकुळतेतूनच आपणाला ज्ञानाचे, शहाणपणाचे द्वार खुले होईल ही आध्यात्मिक गूढवादी अंतर्दृष्टि आपणास लाधली असे मला त्या वेळी वाटले. पण ती अंतर्दृष्टि पुढे पुष्कळशी निमाली आणि माझा जो मूळ पिंड पृथक्करणाची संवय त्याकडे मी पुन्हा वळलो. पण एवढे मात्र खरे की त्या क्षणी मला जी अनुभूति आली तिचा स्पर्श माझ्यासंगे कायमचा राहिला आहे. त्या अनुभूतीचा स्पर्शच, माझी पुढील आयुष्यातील पहिल्या महायुद्धातील शांतिवादी भूमिका, माझे मुलांबद्दलचे उत्कट वात्सल्य, लहानसान संकटांच्या वेळीं मी दाखविलेले मनःस्थैर्य, आणि माझ्याशी संपर्क आलेल्या सर्वच माणसांविषयी ओलावा व जिव्हाळा, यांना कारणीभूत झाला आहे. १९०१ च्या एप्रिलनंतर मी व ॲलिस आमच्या घरी आलो व मी गणिताचे तार्किक निगमन काय असू शकेल याविषयी प्रबंध लिहू लागलो. हाच माझा प्रबंध ‘ प्रिन्सिपिआ मॅथिमॅटिका ’ या ग्रंथाच्या रूपाने परिणत झाला. हा प्रबंध लिहिताना काही काही कूटप्रश्नांवर माझी बुद्धि कुंठित होत असे. व मला वाटले हा ग्रंथ पुरा करणे महाकठिण काम आहे. शरद्ऋतूमध्ये मी व ॲलिस केंब्रिजला गेलो. तेथे मला दोन टर्मपर्यंत ‘ मॅथिमॅटिकल लॉजिक ’ शिकविण्यास पाचारण केले होते. तेथे जी मी व्याख्याने दिली त्यातच ‘ प्रिन्सिपिआ मॅथिमॅटिका ’ या ग्रंथाची रूपरेषा तयार झाली. पण त्यातील माझी बुद्धि कुंठित करणारे कूट प्रश्न शिल्लक होतेच.

केंब्रिजमधील माझी वरील व्याख्याने संपली त्या सुमारचा काळ असेल. मी एकदा सायकलवरून शहराबाहेर लांब रस्त्यावरून हिंडत असता, माझ्या मनात ॲलिसविषयी विचार आले व मला वाटले की ॲलिसवरील आपले प्रेम आता ओसरून गेले आहे. हा विचार माझ्या मनात अगदी ठाण मांडून बसला. खरे म्हणजे, आतापर्यंत आमचे सर्व चांगले चालले होते. ती माझ्यापेक्षा ५ वर्षांनी मोठी होती. व्यवहाराच्या बाबतीत तिला माझ्यापेक्षा अधिक समजत असे. त्यामुळे बहुतेक गोष्टी मी तिच्यावरच सोपविलेल्या होत्या. पण असे असूनही तिच्याविषयी मला आकर्षण वाटेनासे झाले हे मात्र खरे. अर्थात् मी तिला हे स्पष्ट सांगितले नाही पण तिला माझ्या या वर्तनाचा अंदाज आला असावा. तिच्याविषयी माझे आकर्षण कमी झाले हे खरे कारण न सांगता, मी तिच्या वर्तनावर टीका करू लागलो. शेवटी एकदा मी तिला सांगून टाकले की “ माझे तुझ्यावरील प्रेम संपले आहे. याचे कारण तुझा स्वभावच वाईट आहे. ”

स्वतः आपण मोठे सद्गुणी असे समजून तिच्या स्वभावावर टीका करणे हे माझे वागणे गर्हणीय होते, असे आज मला वाटत असले, तरी तिच्या स्वभावावर टीका करण्याच्या बुडाशी काही तथ्यही होते यात शंका नाही. तिच्यामध्ये ढोंगीपणा, लाघवीपणा हे दोष माझ्या प्रत्ययास येऊ लागले होते. कित्येक वेळा मत्सरीपणामुळे ती खोटे बोलत असे. तिने मिसेस् व्हाइटहेड यांना माझ्याविषयी सांगितले की मला लहान मुलांचा सहवास सहन होत नाही; व त्याचवेळी मला मिसेस व्हाइटहेडविषयी सांगत होती की, त्या वाईट आई आहेत कारण त्या मुलांचे नीट चांगले करीत नाहीत. तिच्या स्वभावातील अशा काही खोडी माझ्या लक्षात आल्यामुळे, मला वाटत होते तशी ती सज्जन नाही हे कळून चुकले. अर्थात् तिच्या अंगी इतर जे चांगले गुण होते ते कृतघ्नपणे

विसरून तिच्याशी दुरावा करण्यात मी फार पुढे वाहवलो यात शंका नाही.

ॲलिसबद्दल माझी भावना बदलून ती नकोशी वाटण्यास तिच्या आईबद्दल व माहेरच्या माणसांबद्दल मला वाटणारी चीड हाही भाग असावा. ॲलिसला आपल्या आईविषयी अपार प्रेम व आदर होता. परंतु तिच्या आईचा स्वभाव मला बिलकुल आवडत नसे. तिने आपल्या नवऱ्याला ज्या अपमानकारक रीतीने वागविले, त्यावरून ती बाई दुष्ट असावी असे माझे मत झाले.

हा काळ माझा अत्यंत व्याकुळतेचा गेला. सर्व रात्रभर मला झोप नसे. पहाटे पक्ष्यांची चिवचिव ऐकत, सूर्योदयाकडे पहात, बाहेरचे सौंदर्य अनुभविण्याचा प्रयत्न करीत स्वतःला विसरण्याचा प्रयत्न करीत होतो. गेल्याच वर्षी, माणूस किती असहाय व एकला आहे ही मी अनुभवलेली भावना पुन्हा माझ्यात जोगाने उसळून आली. वाऱ्याने शांतपणे हलणाऱ्या उंच गवतापासून शान्तीचा संदेश मिळेल अशी अंधुक आशा बाळगीत एकटाच मी माळावरून हिंडत असे. याच वेळेला 'फ्री मॅन्स वर्शिप' हा माझा लेख लिहिण्यास मी सुरुवात केली.

ॲलिस व मी बाह्यतः एकत्र रहात असू. ॲलिस माझ्यापेक्षाही असुखी होती. माझे भावनात्मक जीवन अशा प्रकारे अत्यंत प्रक्षुब्ध व अस्वस्थ असतानाच्या या काळात मी 'प्रिन्सिपल्स ऑफ मॅथिमॅटिक्स' ह्या पुस्तकाचे लेखन संपूर्ण संपविले व 'प्रिन्सिपिआ मॅथिमॅटिका' या पुस्तकाच्या लेखनास व्हाइटहेड यांच्या सहकार्याने लागलो. ॲलिस माझ्याशी एकनिष्ठ होती व माझे भंगलेले प्रेम पुन्हा सांधून परत मिळविण्याचा प्रयत्न करीत होती. पण मला तिच्याविषयी आकर्षण वाटेनासेच झाले. व तिचा हा प्रयत्न फुकट आहे असे मला वाटले. आज विचार करता मला वाटते की, आम्ही १९०३ पर्यंत जी नऊ वर्षे बाह्यात्कारी एकत्र राहून काढली, ती एकत्र रहायला आम्ही नको होते. पण तिचा आग्रह होता. 'नाहीतर मी आत्महत्या करीन' अशी तिने दहशत घातली होती. दुसऱ्या कोणत्याही स्त्रीकडे माझे मन अजून आकृष्ट झाले नव्हते. म्हणून मी तिच्या म्हणण्याला होकार देऊन एकत्र राहिलो.

'प्रिन्सिपिआ मॅथिमॅटिका'चे माझे काम चालू होते. पण त्या कामात असे काही कूट प्रश्न निर्माण होत की माझी बुद्धि कुंठित होई व गाडे पुढे ढकलत नसे. दररोज सकाळी मी कोरे कागद डोळ्यासमोर धरून कूट प्रश्नांचे उत्तर सुचते का म्हणून बसत असे. पण संध्याकाळ झाली तरी मी असाच त्याच कोऱ्या कागदांकडे टक लावून बसलेला असे. मनातून एक अनिवार्य प्रेरणा सारखी टोचीत असे की, हे पुस्तक पुरे झालेच पाहिजे. पण प्रत्यक्ष अनुभवावरून असे वाटे की, आपले पुढील सबंध आयुष्य, कूट प्रश्न सोडविता न आल्यामुळे, नुसते कोऱ्या कागदाकडे बघत कंठावे लागणार! कित्येक वेळा मी अत्यंत चिडून जाऊन स्वतःशीच म्हणे की, "कोठल्या या नसत्या उपद्व्यापात आपण नसतेच सापडलो आहोत ! ज्या प्रश्नांच्या मागे आपण लागलो आहोत त्यांना एवढे महत्त्व खरोखरी आहे का ?" – पण १९०५ पासून जरा परिस्थिती बदलली. व्हाइटहेडना अध्यापनाचे काम असल्यामुळे त्यांना वेळ नव्हता. म्हणून मीच १९०७ ते १९१० पर्यंत दररोज १०-१२ तास काम करून पुस्तक पुरे केले. पुस्तकाचे हस्तलिखित एवढे मोठे झाले की ते युनिव्हर्सिटीप्रेसमध्ये नेताना चारचाकी गाडी भाड्याने करावी लागली. युनिव्हर्सिटीप्रेसने सांगितले की असे पुस्तक छापून प्रकाशकाला ६०० पौंड तोटाच येईल. त्यापैकी ३०० पौंड युनिव्हर्सिटी देणार होती. रॉयल सोसायटी २०० पौंड देणार होती. म्हणून राहिलेल्या १०० पौंडाची व्यवस्था आम्हाला स्वतःला करणे आले. त्याप्रमाणे प्रत्येकाच्या वाट्याला ५० पौंड देणे आले. म्हणजे आम्ही १० वर्षे काम करून शेवटी आमच्या पदरचे प्रत्येकी ५० पौंड खर्चिणे हा आम्हाला भुर्दंड पडला. आमच्या पुस्तकाच्या या कथेपुढे मिल्टनच्या 'पॅरॅडाइस लॉस्ट'ची कथा फिकीच पडेल!

१९०२ ते १९१० या काळात घरातील असुखी वातावरण व त्याच्या जोडीला बौद्धिक कामाचा ताण मला असह्य वाटला. आपण बोगद्यात तर शिरलो आहोत त्यातून शेवटी बाहेर पडू की नाही याची












मला आरंभी वानवा वाटे. परंतु आलेल्या अडचणी व कूटप्रश्न माझ्या व्यक्तिमत्त्वाला एक आव्हानच होते. ते मी स्वीकारुन नेटाने पुरे केले. पण माझ्या बुद्धीला जो ताण पडला, त्यातून ती पूर्णपणे पुढे देखील पुन्हा धट्टीकट्टी झाली नाही, अशी माझी धारणा आहे. अशा प्रकारचे सूक्ष्म किचकट काम करण्याची शक्ती माझी पुढे कमी झाली. पुढे मी माझ्या कामाचे व लेखनाचे जे स्वरुप बदलले त्याचे हे एक कारण असावे.

या काळांत हिवाळयाच्या दिवसात मी राजकीय प्रश्नांत लक्ष घालून काही काम करू लागलो. १९०२ मध्ये सिड्नेे वेबने स्थापन केलेल्या एका क्लबाचा मी सभासद झालो. त्या क्लबाचे सामान्य धोरण साम्राज्यवादी होते. तेथेच माझी एच्. जी. वेल्सची पहिल्यांदा ओळख झाली. त्यांची व माझी मते जुळत असत असे मला आढळून आले. बहुतेक सदस्यांची मते ऐकून मला धक्का बसे. मी माझी युद्धविरोधी मते जोराने मांडीत असे. तेथील प्रतिकूल वातावरण बघून मी त्या क्लबचा राजीनामा दिला. १९०६ च्या निवडणुकीनंतर मी स्त्रियांना मतदानहक्क मिळावा या चळवळीत पडलो. १९०७ मध्ये एक पार्लमेंटची पोटनिवडणूक होती. तिला मी स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळावा याचा प्रचार करण्याच्या हेतूने उभा राहिलो. त्यावेळी स्त्रियांच्या मतदानहक्काला किती तीव्र विरोध होता याची आज कल्पना येणार नाही. सभांतून अशा उमेदवारांची टवाळी व हुर्यो होई. माझ्यावर तर कुजकी अंडी फेकली व माझ्या पत्नीला ती लागली. माझ्या पहिल्याच घेतलेल्या सभेत, उंदीर सोडण्यात आले व स्त्रिया भिऊन ओरडत पळत सुटल्या व सभेत दंगल माजली. पुरुषांचे प्रभुत्व स्त्रियांच्या मतदानहक्कामुळे कमी होणार होते. म्हणून पुरुषमंडळी गुंडपणा करुन सभा मोडू लागली, हे एक वेळ समजण्यासारखे आहे. परंतु स्त्रियाच जेव्हा स्त्रीजातीचा हीन दर्जा पुढेही चालू रहावा असे म्हणून पुरुषांना हातभार लावू लागल्या तेव्हां त्याचें मला आश्चर्य वाटले. स्त्रियांना राजकीय हक्क मिळू नयेत असे म्हणणाऱ्यामध्ये राणी व्हिक्टोरिआ ही प्रमुख होती.

स्त्रियांना पुरुषांइतकेच समान हक्क असावेत या मताचा पुरस्कार माझ्या अगदी कुमारावस्थेपासून, जेव्हा मी मिलचे ग्रंथ वाचले तेव्हापासून, करीत आलो आहे. माझी आईही १८६० च्या सुमारास स्त्रीहक्काची पुरस्कर्ती असून तिने त्याचा प्रचारही केला होता हे मला कळले. आता तर सर्वच सुधारलेल्या देशातून लोकमताचे वारे बदलून स्त्रियांना मतदानाचे हक्क मिळाले आहेत, याचे सुखद आश्चर्य वाटते. अशा यशस्वी कार्याच्या कामी मीही थोडाफार वाटा उचलला याचे मला समाधान आहे.

## प्रेमप्रकरण व पहिल्या विवाहाचा शेवट

'प्रिन्सिपिआ मॅथिमॅटिका' हा ग्रंथ संपल्यावर मला चुकल्याचुकल्यासारखे वाटू लागले. कृतार्थतेची एक भावना होतीच पण त्याचबरोबर आपण एका तुरुंगात डांबलेले होतो तेथून सुटलो आता काय करावयाचे अशा गोंधळलेल्या मनःस्थितीत माझे काही दिवस गेले. राजकारणात काही काम करावे असे वाटू लागले. लिबरल पक्षाचा उमेदवार म्हणून उभे राहून पार्लमेंटमध्ये जावे असे ठरविले. मला त्यांनी एका, बेडफर्ड मतदारसंघातून उभे करावयाचे ठरविले. मी त्या पक्षाच्या असोशिएनपुढे एक व्याख्यानही दिले. त्या व्याख्यानापूर्वी त्या पक्षाच्या एका अधिकाऱ्याने माझ्यावर प्रश्नांची सरबत्ती सोडून माझी मते काय आहेत याचा अंदाज घेतला. त्याचे काही प्रश्न व माझी उत्तरे अशी : "तुम्ही 'चर्च ऑफ इंग्लंड'चे सभासद आहात का ?" नाही. मी नानकन्फॉर्मिस्ट आहे. मला चर्चचे नियम पसंत नाहीत." "तुम्ही अज्ञेयवादी आहात का ? " हो." "मधून मधून तरी तुम्ही चर्चमध्ये जाल का ?" "नाही." "तुमची पत्नी तरी मधूनमधून चर्चमध्ये जाईल का ?" "नाही. तीही जाणार नाही." "मग तुम्ही अज्ञेयवादी (ॲग्नॉस्टिक) आहात असे जगजाहीर होईल." "होय. तसे होणे संभवनीय आहे." — या माझ्या उत्तरामुळे त्यांनी माझी उमेदवारी रद्द केली व दुसऱ्यालाच निवडले.

मला देखील वाटले की बरे झाले आपण त्यातून बचावलो ! कारण मला केंब्रिजच्या ट्रिनिटी कॉलेजकडून गणिताच्या लेक्चररच्या जागेबद्दल निमंत्रण आले. त्याप्रमाणे १९१० च्या ऑक्टोबरपासून मी ती नेमणूक स्वीकारली. लिबरल पक्षाची उमेदवारी जरी








मिळाली नाही, तरी त्या पक्षाच्या उमेदवारांकरिता प्रचार–कार्य तरी करावे असे माझ्या मनाने घेतले. मी रहात होतो त्याच्या शेजारच्याच मतदारसंघातून लिबरल पक्षाचा उमेदवार म्हणून फिलिप मॉरेल उभा होता. त्याला मदत करावयाचे मी ठरविले. फिलिप मॉरेल माझा मेहुणा लोगन स्मिथ याचा जिवलग स्नेही होता. त्याच्याकरिता खेड्याखेड्यातून घरोघर जाऊन मी प्रचार करू लागलो व निवडणूक सभांतून भाषणेही केली. फिलिप मॉरेल या निवडणुकीत अयशस्वी झाला. पण या प्रचाराच्या निमित्ताने माझी व त्याची पत्नी ऑटोलिन याची चांगली ओळख झाली. पुढे मार्च १९११ मध्ये मला पॅरिस येथे व्याख्याने द्यावयाचे निमंत्रण आले. पॅरिसला जाताना लंडन येथे एक दिवस मुक्काम करणे मला सोईचे होते. म्हणून मी मॉरेल याच्या घरी मुक्काम करावयाचे ठरविले. त्याप्रमाणे मी त्यांच्याकडे उतरलो. त्यांचे घर मोठे सुंदर होते. व सर्व सामानाची मांडणी अभिरुचि-संपन्न होती. मला ऑटोलिनच्या सौन्दर्याभिरुचीचे कौतुक वाटले. त्या मानाने आमच्या स्वतःच्या घरात ॲलिसच्या क्वेकरपंथीय वळणामुळे, सर्व साधेसुधे व अनाकर्षक होते. त्यात सौंदर्य नव्हते. ऑटोलिनच्या घरातील सौन्दर्यपूर्ण वातावरण बघून मी अगदी मोहून गेलो. माझ्यातील आत्तापर्यंत उपासमार झालेली सौन्दर्यभावना तिच्या घरातील वातावरणाने जणूं तृप्त झाल्यासारखे वाटले. बाह्य जगाच्या भगभगीतून आपण एका शान्त विश्रान्तिस्थळी आलो आहोत असा मला अनुभव आला. मी ज्या दिवशी ऑटोलिनकडे आलो, त्यावेळी फिलिप तेथे नव्हता, कोठे बाहेरगांवी गेला होता. ऑटोलिनशीच माझ्या संभाषण-गोष्टी झाल्या. लवकरच आमच्यात सलगी उत्पन्न होऊन गुजगोष्टीत रूपांतर झाले. त्यावेळी आपण या बाईच्या प्रेमात सांपडलो आहोत हे माझ्या लक्षात आले. ॲलिसचे व माझे जीवन गेली ९ वर्षे निष्प्रेम व भकास असे चालू होते. आज ऑटोलिनच्या संगतींत माझ्यांतील उपासमार झालेली प्रेमभावना उफाळून वर आली. ऑटोलिनला माझे हृद्‌गत मी सांगितले. तिनेही मला प्रतिसाद दिला. पुन्हा आम्ही भेटावयाचे ठरविले. पॅरिसला जाऊन मी व्याख्याने देऊन घरी परत आलो. ॲलिसला माझे ऑटोलिन– प्रेमप्रकरण स्पष्टपणे सांगण्याचे मी ठरविलेच होते. त्या आधी माझा दांत दुखूं लागला. म्हणून मी डेंटिस्टकडे गेलो. डेन्टिस्टने मला दांताचा कॅन्सर असावा अशी शंका व्यक्त केली व एका तेथील तज्ज्ञाला दाखवायला सांगितले. पण तो तज्ज्ञ ईस्टरच्या सुट्टीत बाहेरगांवी गेला होता तो तीन आठवडे येणार नव्हता. म्हणून तेवढी वाट पहाणे मला भाग होते. मग ॲलिसला मी ऑटोलिन– प्रेमप्रकरण सांगितले. ती एकदम चवताळून उठली व ‘ ऑटोलिनचे नांव जाहीर करून घटस्फोट मागेन ’ असे म्हणाली. ऑटोलिनला एक मूल होते. मुलावर व नवऱ्यावर तिचा जीव होता हे मला माहीत होते. म्हणून “ऑटोलिनचे नांव गोंवून घटस्फोट मी मागणार” असे ॲलिसने सांगितल्याबरोबर मी तिला निक्षून बजावले “तू घटस्फोट केव्हांही घे. पण त्यात ऑटोलिनचे नाव गुंतवू नकोस. जर तू तसे करशील तर मी आत्महत्या करीन !” मी जे म्हणेन ते करीन असे तिला ठाऊक होते. ती रागाने खूप जळफळली व मला वाटेल तसे टाकून बोलली. मी सरळ सायकल घेतली व तेथून निघून गेलो. अशा रीतीने माझ्या पहिल्या विवाहाचे प्रकरण आटोपले. पुढे १९५० साली माझी ॲलिसची भेट झाली पण ती एका परिचितासारखी.

घरून मी जो गेलो तो ऑटोलिनकडेच. मला कॅन्सर आहे अशी डॉक्टरने भीति घातली होती. माझ्या मनातही ही भीति उत्पन्न झाली होती. पण मी माझ्या मनातील भीति ऑटोलिनला सांगितली नाही. मी तीन दिवस तिच्या घरी घालविले. कॅन्सर असेल तर आपण लवकरच मरणार या विचाराने माझ्या सुखाची उत्कटता वाढलीच होती. ज्या दुष्ट दैवाने डॉक्टरां-करवी मला कॅन्सरची भीति घातली त्या दैवावर मी जणू मात करतो आहे असे मला वाटले. पुढे मी तज्ज्ञ डॉक्टराला भेटलो, तेव्हां कॅन्सर वगैरे काहीही नाही असे त्याच्याकडून मला कळले.

## जोसेफ कॉन्‌रॅड

१९१३ मधील आणखी एक महत्त्वाची घटना म्हणजे जोसेफ कॉन्‌रॅडची माझी ओळख. ऑटोलिन-चाही तो स्नेही होता. तिच्यामुळे माझी त्याची ओळख होऊन त्याचे गाढ स्नेहात रूपांतर झाले. कॉन्‌रॅ-डशी जे व जसे माझे संबंध आले तसे दुसऱ्या कोण-








त्याही व्यक्तीशी आले नाहीत. त्याची व माझी भेट क्वचित् होई. आमचे बाह्य जीवन तर अगदी विसदृश होते. पण त्याचा व माझा मानवाचे जीवन व नियति यांकडे पहाण्याचा दृष्टिकोण समान होता. त्यामुळे आम्ही अतूट स्नेहपाशाने बांधलो गेलो. त्याने माझ्याविषयी जे लिहिले आहे ते उद्धृत करण्यासारखे आहे: "तुझ्याविषयी मला जो आदर व स्नेह वाटत आहे तो, तूं मला पुढे केव्हाही भेटला नाहीस व माझे अस्तित्व जरी विसरुन गेलास, तरी कायमचा व न बदलणारा आहे." कॉन्रॅडविषयी देखील माझ्या याच भावना होत्या. त्या व्यक्त करण्याकरिताच विनयशीलता सोडून, वरील उतारा मी दिला आहे.

कॉन्रॅडचे मन जर कोणत्या गोष्टींचा विचार करण्यात चूर झाले असेल तर त्या म्हणजे- एकटा मानवी आत्मा, त्याविरुद्ध सुखदुःखांची पर्वा न करणारा निसर्ग, परस्पर द्वेष करणाऱ्या मानवी व्यक्ती आणि मानवी अंतःकरणातील चांगल्यावाईट वासनांचा चाललेला जीवघेणा संघर्ष. मानवाच्या एकलेपणाची करुण कहाणी त्याच्या कथांतून चित्रित केलेली आढळते. एकटेपणा आणि काही विलक्षण घडून येत आहे याची भीषण छाया हे वातावरण त्याच्या साहित्यात भरुन राहिले आहे. आधुनिक काळी दोन प्रकारची तत्त्वज्ञाने आहेत : एक रूसोपासून निघालेले, ज्यात शिस्त व संयम या गोष्टी झुगारुन दिल्या आहेत; दुसरे तत्त्वज्ञान म्हणजे समष्टिवाद ( totalitarianism ) ज्यात शिस्त किंवा संयम बाहेरुन माणसावर लादला जातो. कॉन्रॅडचे मत या दोहोंपेक्षा निराळे, प्राचीन वळणाचे होते. त्या मताप्रमाणे, शिस्त किंवा संयम आतून आलेला स्वयंस्फूर्त असला पाहिजे. बेशिस्तपणा, व बाहेरून लादलेली शिस्त याचे त्याला वावडे होते. या दृष्टिकोनामुळे माझे व कॉन्रॅडचे चांगले जमत असे. पहिल्याच भेटीत आम्ही इतक्या जिव्हाळ्याने बोललो, की वरवरचे शिष्टाचाराचे बोलणे विरत जाऊन, आमच्या परस्परांच्या अंतःकरणातील पेटलेल्या आगीचे आम्ही जवळून दर्शन घेत होतो. आम्हाला परस्परांविषयी वाटणारी भावना इतकी उत्कट व परमावधीची होती की त्याचा निरोप घेऊन मी घरी परत आलो तरी माझे चित्त ठिकाणावर नव्हते व नेहमीच्या कामावर माझे लक्ष लागत नव्हते.– पुढे माझे दुसरे लग्न होऊन १९२१ साली मला मुलगा झाला. त्या मुलाचे नाव मी जॉन कॉन्रॅड असे ठेविले. माझे वडिल, आजे व पणजे जॉन होते म्हणून जॉन आणि कॉन्रॅडविषयी मला जी जिव्हाळ्याची भावना होती तिचे प्रतीक म्हणून कॉन्रॅड. हे नाव मी कॉन्रॅडला विचारुन त्याच्या आनंदपूर्वक संमतीनेच ठेविले. मी चीनहून परत आल्यावर चीनवर जे पुस्तक लिहिले त्यासंबंधी त्याने प्रशंसा करून मला असे लिहिले :

"चीनसंबंधी तुम्ही विश्लेषण करुन मोठे उद्बोधक लिहिले आहे. परंतु ते वाचून माझे मत असे झाले की चीनचे भवितव्य भीषण आहे." त्याने जे चीनविषयी हे निराशावादी उद्गार काढले आहेत ते मला माझ्या चीनविषयी व्यक्त केलेल्या कृत्रिम आशावादापेक्षा अधिक शहाणपणाचे व सुज्ञपणाचे वाटले. पुढील इतिहासाने कॉन्रॅडचे म्हणणे खरे ठरले आहे.

## अमेरिकेत व्याख्याने व अध्यापन

१९१४ साली मला बोस्टनला लॉवेल व्याख्याने देण्याविषयी निमंत्रण आले. त्याच काळात मी हार्वर्ड येथे तत्वज्ञानाचा प्रोफेसर म्हणून काम करावे म्हणूनही मला पाचारण करण्यात आले. मी माझ्या व्याख्यानांचा विषयही जाहीर करुन बसलो होतो. व्याख्याने लिहून द्यावयाची होती. परंतु कित्येक दिवस विचार करूनही काय लिहावे हे समजेना. १९१४ च्या आरंभी केंब्रिजला परत गेलो. आता आपण लॉवेल व्याख्याने तयार केलीच पाहिजेत असे वाटून एका टायपिस्टला दुसऱ्या दिवशी येण्यास बोलावणे पाठविले. टायपिस्ट येईपर्यंत मजकूर काय सांगायचा याची मला थोडी देखील कल्पना नव्हती. जशी ती आली, त्याबरोबर माझी बुद्धि काम करू लागली, विचारांची घडी जागच्या जागी बसू लागली आणि मी व्यवस्थितपणे एकामागून एक अशा क्रमाने दररोज तोंडी सांगून सर्व मजकूर टाइप करून घेतला. तेच माझे पुस्तक 'Our Knowledge of the External World' या नावाने प्रकाशित झाले.

हार्वर्डला मी शिकवीत असताना माझ्या पोस्ट-ग्रॅज्युएट वर्गात बारा विद्यार्थी होते. दर आठवड्याला त्यांना मी चहाला बोलावीत असे. त्यापैकी एक










विद्यार्थी टी. एस्. ईलिअट होता. ईलिअट हा कवि आहे हे मला त्यावेळी ठाऊक नव्हते त्याने काही कविता लिहिल्या होत्या पण त्याने मला त्या सांगितल्या नाहीत. तो फारच अबोल होता. पण एकदाच तो बोलला त्यामुळे त्याच्याकडे माझे लक्ष वेधले. मी हेरॅक्लिटसची प्रशंसा करीत होतो. ती ऐकून तो म्हणाला : "होय. हेरॅक्लिटस-तत्त्वज्ञान वाचताना मला नेहमी व्हिलॉन (Villon) ची आठवण होते !" त्याचे हे विधान मला इतके आवडले कीं, मला वाटे याने पुन्हा अशासारखे बोलावे. दुसरा एक विद्यार्थी डेमॉस नावाचा होता. तो ग्रीक होता. त्याचे शिक्षण आशिआ मायनरमध्ये झाले. तेथे तो एका लहानशा लायब्ररीचा ग्रंथपाल होता. तेथील सर्व पुस्तके वाचून झाल्यावर तेथे तो कंटाळला व जमलेले पैसे खर्च करून बोस्टनला आला. बोस्टनला त्याने एका उपाहारगृहात 'वेटर' म्हणून काम केले व मग हार्वर्ड विद्यापीठात शिकून प्रोफेसर झाला. हार्वर्ड विद्यापीठात राल्फ बार्टन पेरी नावाचे प्रोफेसर होते. ते माझ्या खोलीत आले असताना माझ्याकडे रूपर्ट ब्रूक नावाचा तरुण कवि आला होता त्याची-त्यांची गाठ पडली. रूपर्ट 'साऊथ सी आयलंड्स' कडून परत जात असता वाटेत थांबला होता. त्याने बोलता बोलता "या बेटातून पूर्वी माणसाला मारून नरमांस खात असत ती प्रथा आता बंद पडली आहे. त्यामुळे लोकांमधील शौर्य– धैर्य-पौरुषवृत्ति कमी झाली आहे" असे म्हटले. प्रोफेसर पेरींना हे वर्णन ऐकून दुःख झाले. ते म्हणाले. "मानवहत्या करून नरमांस भक्षण करणे पाप नाही का ?" पुढे रूपर्ट ब्रूक युद्धात मरण पावला. युद्धात मरण पावलेल्याचे गुणगान करण्यात पुढे पेरीही सामील झाले होते. प्रो. पेरींना कल्पनाही नसेल की माझ्या खोलीत भेटलेला तो त्यांना नको ती मते बडबडणारा तरुण देशाकरता रक्त सांडणारा दैवी गुणसंपन्न होता !

एकदा हार्वर्ड येथील व्याख्याने संपल्यावर मी ॲन आर्बोर येथील विद्यापीठात गेलो. तेथील अध्यक्षांनी मला ते विद्यापीठ, विशेषतः त्यातील लायब्ररीची इमारत अभिमानाने दाखविली : "आमच्या लायब्ररीत अत्यंत शास्त्रीय पद्धतीने तयार केलेली ग्रंथसूची आहे." असे ते सांगत असताना खुर्च्या-टेबले ठेवलेल्या एका मोठ्या हॉलमध्ये आम्ही उभे होतो. मी विचारले : "काहो कोणी पुस्तके वाचते तरी का ?" त्यांना या प्रश्नाने आश्चर्य वाटले. ते बोट दाखवून म्हणाले : 'तो पहा तेथे एक जण वाचीत बसला आहे !' आम्ही गेलो व पाहिले तो एकजण कादंबरी वाचीत बसला होता.

ॲन आर्बोरहून मी शिकॅगोला गेलो. तेथे एका स्त्रीरोगतज्ञ डॉक्टरांकडे उतरलो. त्या गृहस्थाला चार मुली होत्या. त्यातील एक मुलगी पूर्वी इंग्लंडमध्ये जिल्बर्ट मरे यांच्याकडे ग्रीक शिकण्याकरिता आली होती. त्यावेळी ती मला व ॲलिसला भेटली होती. मी आता शिकॅगोला येतो आहे असे कळल्यावर तिने मला पत्र लिहून 'तुम्ही आमच्याकडेच उतरा' असे कळविले. ती मला स्टेशनवर घ्यायला आली होती. तिला माझ्याविषयी विलक्षण जिव्हाळा वाटत होता असे दिसले. ती स्वभावाने एकली व असुखी होती. तिच्या भावनात्मक जीवनातील उणीव मी भरून काढू शकेन असे तिला वाटले असावे. मी तिला सांगितले की 'तू इंग्लंडमध्ये ये व मला घटस्फोट मिळाला तर आपण एकत्र राहू.'

## पहिले महायुद्ध सुरू

नंतर मी इंग्लंडकडे परतलो. इतक्यात शिकॅगोमधील त्या मुलीने आपल्या वडिलांचे मन वळवून त्यांच्यासह ती १९१४ आगस्टमध्ये इंग्लंडमध्ये आली. ती आली, त्या वेळेला पहिले महायुद्ध सुरू झाले असून, युद्धाच्याच विचारात मी चूर होऊन गेलो होतो. म्हणून त्या मुलीला पूर्वी म्हटल्याप्रमाणे तिच्याशी एकत्र रहाणे मला शक्य झाले नाही. युद्धाच्या विचाराने माझ्यातील प्रणयभावना जणू नष्ट झाली. यामुळे त्या मुलीला मोठा धक्का बसला. तिची प्रकृति बिघडली. तिने हंथरूण धरले. तिचे डोके फिरले. जर युद्ध मध्येच उपटले नसते, तर मी केलेल्या योजनेप्रमाणे वागून आम्ही दोघेही सुखी झालो असतो. तिच्या शोकांतिकेची मला आजही आठवण होऊन हळहळ वाटते.

---








## ग्रंथ परिचय–

### प्राचीन महाराष्ट्राचा धार्मिक इतिहास *

प्राचीन महाराष्ट्र आणि त्याचा सांस्कृतिक इतिहास या विषयावर मराठी भाषेत विपुल प्रमाणात ग्रंथ उपलब्ध आहेत त्यातून प्राचीन महाराष्ट्राचा धार्मिक इतिहास साकल्याने आढळत नाही. प्रा. भुसारी यांनी या इतिहासाचे दर्शन ( इ. स. पूर्व २०० ते इ. स. १३५० ) या ग्रंथात संकलित स्वरूपाने घडविले आणि त्या अनुषंगाने अनेक वर्षाच्या चिंतन- मननातून तयार झालेली आपली मते प्रतिपादिली. आपल्या मताच्या समर्थनार्थ आवश्यकतेनुसार केव्हा मूळ ग्रंथांचे तर केव्हा कोरीव लेखांचे आणि त्याबरोबरच नवनवीन संशोधनाने उजेडात आलेल्या पुराव्यांचे आधार दिले आहेत. विद्वानांशी झालेला मतभेदही त्यांनी नम्रतेने सुचविला आहे. "... काही बाबतींत आमचा प्रा. भुसारींशी मतभेद असला तरी त्यांचे पुस्तक विचारप्रवर्तक व उपयुक्त झाले आहे यांत संशय नाही." या, महामहोपाध्याय डॉ. वा. वि. मिराशी यांच्या अभिप्रायाशी कुणीही सहमत होईल. ( पुरस्कार. )

वैदिक सनातन, बौद्ध आणि जैन या धर्मांचे महाराष्ट्रातील आगमन आणि विस्तार; नाथ, शाक्त, वीरशैव या पंथांचे महाराष्ट्राशी आलेले संबंध; वारकरी, दत्त आणि महानुभाव या संप्रदायांचा महाराष्ट्रात झालेला उदय आणि उत्कर्ष तसेच इस्लाम आणि सूफी या परधर्म आणि पंथ यांचा महाराष्ट्रातील धार्मिक जीवनावर झालेला परिणाम आणि महाराष्ट्रातील इतर देव-देवता यांचा परिचय या ग्रंथातून प्रा. भुसारी यांनी करवून दिला आहे. 'सूर्य आणि गणपतीची उपासना' यांचे प्राचीनत्व त्यांनी सिद्ध केले पण या देवतांचे महाराष्ट्रातील अस्तित्व अनुषंगानेच आले आहे. ते सविस्तरपणे आले असते तर महाराष्ट्राच्या धार्मिक इतिहासाची एक बाजू पूर्ण झाली असती.

शिव आणि विष्णु या दोन प्रमुख देवतांची उपासना इ. स. पूर्व दुसरे शतक किंवा त्याही पूर्वीपासून चालू होती ( पृ. १५ ); मत्स्येन्द्र आणि अल्लमप्रभु हे समकालीन नव्हेत. ( पृ. ५७ ); कार्तिकेय, ब्रह्मा, गौरी, दन्ती ह्या पौराणिक देवता असून 'मांत्रेतर संस्कृतींतून श्रौत संस्थात या देवतांचा समावेश झालेला दिसतो.' या ज्ञानकोशकारांच्या मताशी साधार विरोध दर्शवून विष्णु, रुद्र, सूर्य यांची महादेव, केशव, नारायण हीही नावे प्रचलित होती. ( पृ. ८५–८६ ), '...... विष्णु, वासुदेव आणि नारायण ह्या देवता एकरूप असून ऋग्वेदातील विष्णु या देवतेची वासुदेवादि नावे ह्याच एका देवतेची होय ......' हा आपला सिद्धांत डॉ. भांडारकर व ज्ञानकोशकार डॉ. केतकर यांच्या मताशी विरोध दर्शवून प्रस्थापिला आहे. ( पृ. ९२–९८ ); वासुदेव आणि गोपाळकृष्ण यांचे ऐक्यही त्याच पुराव्यांच्या आधारे त्यांनी प्रतिपादिले आहे. ( पृ. ९९–१०१ ), विठ्ठल या नावाची चर्चा करून शिलाहार राजाच्या सांधिविग्रहीकाच्या विठ्ठैय या नावातील 'पैय' हे आडनाव होते. ( पृ. १५८–६० ), दत्तात्राचा उदय त्रिपुरसुंदरीच्या शाक्तपंथातून झालेला नाही. ( पृ. १८८–८९ ), यादवकालीन महाराष्ट्रात शिवपूजा जास्त प्रमाणात प्रचलित होती. ( पृ. २०३ ), प्राचीन काळी महाराष्ट्रात असलेली सूर्यमंदिरे आज जरी अस्तित्वात नसली तरी सूर्योपासना खंडित झालेली नाही. ( पृ. २१०–१६ ), डॉ. भांडारकर व म. म. डॉ. वा. वि. मिराशी यांच्या गजानन विषयक मतांशी विरोध दर्शवून मैत्रायणी व काठक संहिता या काळी गजाननाची उपासना होती. (पृ. २२४–३२) हा काढलेला निष्कर्ष आणि ही मते प्रा. भुसारी यांच्या दीर्घ चिंतनाची आणि व्यासंगाची साक्ष देतात. अभ्यासकांना त्यांनी केलेले हे आवाहन आहे आणि प्राचीन धार्मिक इतिहासात घातलेली ही त्यांची मोलाची भर आहे.

नाथ संप्रदायाची उदयभूमी ही दक्षिणेतील श्री शैल नसून ती उत्तरभारतातच होती हे त्यांनी साधार पटवून दिले आहे. परंतु हे विवेचन करीत असताना केवळ श्री. रा. चिं. ढेरे यांच्या मतांचे खंडण करणे एव्हढाच या लेखाचा उद्देश आहे की काय अशी शंका येते; त्यामुळे नाथपंथाचे सम्यक दर्शन या लेखातून घडत नाही. 'दत्त संप्रदाय' ह्या लेखातून श्री. ढेरे यांचे 'नृसिंह सरस्वति : चरित्र आणि परंपरा' या पुस्तकाचा आणि 'सूफी संप्रदाय' ह्या लेखातून

* 'प्राचीन महाराष्ट्राचा धार्मिक इतिहास' – प्राचार्य र. म. भुसारी प्रकाशक : मराठी साहित्य परिषद, आन्ध्रप्रदेश, हैदराबाद २७; एप्रिल १९६५; मूल्य सात रुपये.








श्री. सेतु-माधवराव पगडी यांचे ‘ सूफी संप्रदाय ’ या पुस्तकाचा सरळ सरळ अनुवाद आणि सारांश दिलेला आहे. एव्हढेच नव्हे तर ‘...... एक मुखी आणि चार हातांच्या दत्तमूर्तीची उपासना महानुभावांखेरीज आपल्या दासोपंत आणि निरंजन रघुनाथादी दत्तभक्तांनी देखील केली आहे. ’ ( पृ. १८६ ) या ‘ आपल्या ’ मतासाठी श्री. ढेरे यांच्याच मताचा त्यांनी आधार दिला आहे. या दोन्हीही लेखातून केवळ त्या त्या एकाच ग्रंथाचे आधार नोंदविले आहेत. संदर्भासाठी जो साक्षेप हवा तो येथे आढळत नाही. असे दुय्यम-श्रेणीचे संदर्भ या ग्रंथातून इतस्ततः विखुरलेले दिसतात. अभ्यासपूर्ण प्रबंधाची ही सर्वात मोठी उणीव आहे.

संदर्भ देत असताना तळटीपात ते कोणत्या तरी चिन्हाने वा अंकाने दर्शविले जातात. ग्रंथाध्ययनाच्या दृष्टीने ही अत्यंत गौण बाब असली तरी त्यातही एकसूत्रीपणा पाळणे आवश्यक असते. तो येथे पाळलेला दिसत नाही. ( उदा. पृ. २५ वरील तळटीपेनंतरचे क्रमांक, पृ. १९० वरील तळटीप क्रमांक, पृ. १८४ नंतरच्या टीपेत क्र. १०,१०,१३,१४ हे क्रमांकच नाहीत. ) ग्रंथसंक्षेप, ग्रंथनाम आणि त्यावरील तळटीपा यातही एकवाक्यता दिसून येत नाही.

म. म. डॉ. मिराशी यांच्या पुरस्कारात प्रा. भुसारींच्या मतांशी त्यांचा विरोध ( पृ. ४२ : पुरस्कार ) वा त्यांच्या आणि प्रा. भुसारींच्या मतांशी असलेली समानता ( पृ. १४ : पुरस्कार ) तपासून पाहावयाचे ठरविले तर ते त्या त्या पृष्ठांवर आढळत नाही. बहुधा मूळ हस्तलिखितातील ते पृष्ठांक असावेत. ते मुद्रिताप्रमाणे बदलून घेण्याची आवश्यकता भासली नाही. मुद्रितात ते अनुक्रमे ३३ व ९ पृष्ठांक आहेत. ही अनास्था टाळली असती तर बरे झाले असते.

ह्या उणीवा किरकोळ स्वरूपाच्या आहेत. प्राचीन महाराष्ट्राच्या धार्मिक इतिहासाची साकल्याने, एकत्रित स्वरूपात, सुसंगत रीतीने, व्यासंगपूर्ण निवेदन शैलीने, अनाग्रही परंतु संशोधनाच्या सत्यान्वेषी दृष्टीने आणि विद्वत्तेच्या विनयाने प्रा. भुसारी यांनी आपली मते मांडून मराठी वाङ्मयातील फार मोठी उणीव दूर केली आहे हे निःसंशय.

—व. दा. कुलकर्णी

## २

महानुभाव कवी एल्हणा विरचित—

**‘ अष्टनायिका-विवाह ’** ( आठै सैंवर )*

महानुभाव काव्याचे संशोधन आणि संपादन हा प्राचार्य भुसारी यांचा आवडता छंद असून त्यांचा त्या विषयीचा अभ्यास आणि व्यासंग महाराष्ट्रास सुपरिचित आहे. महानुभाव कवी एल्हणा विरचित ‘ अष्टनायिका-विवाह ’ या काव्याचे संपादन त्यांनी अत्यंत साक्षेपाने केले आहे. काव्य-संपादनाच्या जोडीला विवेचक आणि अभ्यासपूर्ण प्रस्तावना, कठीण शब्दांचा कोश, अर्थस्पष्टीकरणार्थ टीपा, व्यक्ति-नामांची माहिती-सह सूचि जोडून अभ्यासकांची त्यांनी सोय केली आहे. त्यासाठी संपादक प्राचार्य भुसारी यांचे अभिनंदन करणे अगत्याचे आहे.

महाराष्ट्र सारस्वतकार वि. ल. भावे आणि महानुभाव वाङ्मयाचे व्यासंगी आणि साक्षेपी संशोधक व संपादक डॉ. य. खु. देशपांडे यांनी या काव्याचा परिचय करून देत असताना त्यांना उपलब्ध झालेल्या या काव्याच्या पोथ्यांतील भिन्न भिन्न पाठांची नोंद प्रा. भुसारी यांनी संहिता सिद्धिसाठी घेतली आहे. एकापेक्षा अधिक प्रति उपलब्ध होऊ न शकल्यामुळे त्यांना एकाच पोथीवर अवलंबून राहावे लागले. पाठचिकित्सा आणि संहिता-संपादन शास्त्राच्या दृष्टीने ही उणीव असली तरी त्यांचा या बाबतीत निरुपाय झाला, याची खंतही त्यांनी व्यक्त केली आहे.

एल्हणा या नावासंबंधी आणि त्याच्या काळासंबंधी त्यांनी विस्तृत चर्चा केली आहे. ( प्रस्ता. ६ ते १३ ) “ एल्हणसुत विद्वांसकृत ‘श्रीकृष्ण बाळक्रीडा’ ” या त्यांच्या लेखात एल्हणसुत विद्वांसाच्या काळाची व काव्याची त्यांनी साधकबाधक चर्चा केली आहे.

* ‘ अष्टनायिका-विवाह ’ संपादक : प्राचार्य र. म. भुसारी, प्रकाशक : मराठी साहित्य परिषद, आन्ध्र प्रदेश, हैदराबाद- २७—१९६७, मूल्य सात रुपये.






( प्रकाशित, 'मराठी स्वाध्याय-संशोधन-पत्रिका,' उस्मानिया विद्यापीठ, अंक २ रा, १९६७. पृ. ३९-४८) 'यावरून एल्हणा कवी हा सोळाव्या शतकापूर्वी होऊन गेला असावा.' या त्यांच्या अनुमानास अधिक पुष्टी मिळते. परंतु 'मंडळीक' हे आडनाव आणि 'विध्वांस' हे नाव या संबंधी त्यांनी केलेला ऊहापोह निरर्थक वाटतो. प्रस्तुत काव्यात 'मंडळीक' या आडनावाचा उल्लेख नाही असे प्रा. भुसारी म्हणतात ( प्रस्ता. १० ) ते विचारास चालना देणारे वाटते, कारण प्रस्तुत काव्य हे 'अष्टनायिका-विवाह' आहे. ते नऊ प्रसंगात वर्णिले आहे आणि दहावा प्रसंग लिहून सोळा सहस्र राजकन्यांच्या विवाहाच्या आख्यानाची या काव्याला पुस्ती जोडलेली आहे. नवव्या प्रसंगाच्या शेवटी म्हणजे काव्य जेथे संपायला हवे तेथेच –

मांडवी समस्तही देव ।
रुषी मानिए मंडळीक महानभाव ।।
पूजा पुरुस्कारी करुनि गौरव ।
पाठविले आश्रमासी ।। ९-७२१.

– या ओवीत वेगळ्या संदर्भात सूचनार्थ का होईना पण कवीने 'मंडळीक महानभाव' असा उल्लेख केला आहे. 'श्रीकृष्ण बाळक्रीडा'कार मुरारीमल्ल नातू एल्हणसुत विध्वांस आणि एल्हण मंडळीक ह्या निर्विवादपणे भिन्न व्यक्ति आहेत. एव्हढेच नव्हे तर 'मंडळीक' हे कुल-नाम असून 'विध्वांस' ही सांप्रदायिक 'गादी' आहे, याचा विसर न व्हावा.

एल्हणाने विवाह-कथा रंगविताना रचनेचे घेतलेले स्वातंत्र्य प्रा. भुसारी यांनी आस्थेने दर्शविले आहे. कवीचे वर्णनचातुर्य, काव्यातील रसोत्कटता, अलंकार योजना आणि या अभ्यासाबरोबरच काव्याची भाषिक पाहणीही प्रा. भुसारी यांनी साक्षेपाने पुरविली आहे. त्यामुळे अभ्यासकांच्या दृष्टीने या ग्रंथाची उपयुक्तता वादातीत आहे हे निःसंशय. श्रीकृष्णाच्या पराक्रमाचे आणि त्याने केलेल्या विवाहांचे भावरसपूर्ण वर्णन हा या काव्याचा विषय असल्याने श्रद्धावान महानुभाव भक्तांना नित्य पारायणासाठीही या ग्रंथाचा खचित उपयोग होईल.

एखाद दुसऱ्या शब्दाचा दिलेला अर्थ योग्य वाटत नाही. उदा. केवाळु ( ६६९ ) = एका पक्वान्नाचे नाव. पण केवाळू याचा अर्थ बारीक बाळ असा आहे. ( वछाहरण. १७७ ). बीसुरा ( २९३ ) याचा अर्थ समृद्धि ( वछाहरण ३६६ ) आहे. चमत्कार किंवा आश्चर्य नव्हे.

असे किरकोळ दोष सोडले तर काव्याचे संपादन व्यवस्थित झाले आहे. प्राचीन महानुभाव काव्याच्या या संपादनाने मराठी वाङ्मयात मोलाची भर पडली आहे. प्रकृतीचे स्वास्थ्य नसताना सुद्धा त्यांनी केलेली ही वाङ्मयाची निरलस सेवा त्यांच्या छंदाचे, अभ्यासाचे, व्यासंगाचे आणि त्यासाठी लागणाऱ्या परिश्रमाचे द्योतक आहे.

जेम तेम १७५ पृष्ठांच्या या ग्रंथाचे मूल्य सात रुपये असून सर्वसामान्य व्यक्तीच्या खिशाला न परवडणारे आहे ही जाणीव प्रगट करावीशी वाटते.

एका चांगल्या प्राचीन काव्याचे अत्यंत साक्षेपाने आणि परिश्रमपूर्वक संपादन केल्याबद्दल प्रा. भुसारी यांचे आणि ते प्रकाशित केल्याबद्दल 'मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश' या संस्थेच्या चालकांचे मनःपूर्वक अभिनंदन !

– व. दा. कुलकर्णी

## वाचकांचा पत्रव्यवहार –

श्री. संपादक ' नवभारत ' यांसी

सा. न. वि. वि.

श्री. विनायकराव करमळकर यांच्या एप्रिल आणि मे महिन्यांच्या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखातील आशयाबाबत माझा संक्षिप्त अभिप्राय कळवीत आहे. पहिल्या लेखाचे शीर्षकच अज्ञानमूलक आहे. 'द्विविधा निष्ठा कोणत्या ' असा अनेकवचनी प्रयोग गीतेत नाही आणि तो व्याकरणशुद्धही नाही. संस्कृतभाषेच्या आणि वाङ्मयेतिहासाच्या अज्ञानाचे निदर्शक कितीतरी शब्द आणि वाक्प्रयोग दोन्ही लेखात आढळतात. त्यांची चर्चा करीत बसत नाही. परंतु गीतेत दोन ' निष्ठा ' सांगितल्या नसून दोन मार्गांनी मिळविण्याची एकच ' निष्ठा ' सांगितली आहे हे लक्ष्यात घेणे आशयाच्या दृष्टीनेही अत्यन्त आवश्यक आहे. हे दोन मार्ग ' ज्ञानयोग ' आणि ' कर्मयोग ' असे स्पष्ट सांगितले असून त्यांच्या अनुयायांना अनुक्रमे ' सांख्य ' आणि ' योगी ' असे संबोधिले आहे. या श्लोकात खरोखर विवाद्य शब्द ' पुरा ' हा असून त्याचा अर्थ 'पूर्वाध्यायांत ' असा टिळक आदि करतात तर ' सर्गारम्भी ' असा शंकराचार्य आदि करतात. या अर्थांवरच दोन मार्गांचे स्वरूप ठरविणे अवलंबून आहे. या मुद्याला बगल देऊन वायफळ गप्पाच प्रथम लेखात लेखकाने दिल्या आहेत असे म्हणणे भाग आहे. टिळकांना कोणी कोणी प्रत्युत्तर केले आणि त्यांचे कोणाशी काय बोलणे झाले हे मूळ मुद्याच्या दृष्टीने वायफळच ठरते ? मूळ गीतेला अनुसरून कोणता अर्थ बरोबर ठरतो याबाबत युक्तिवाद आवश्यक आहे. तो मात्र दोन्ही लेखात अभावानेच प्रत्ययास येतो असे खेदाने म्हणावे लागते. तथापि टिळकांनी ' कर्मयोग शब्दाचा केलेला अर्थ गीतेच्या दृष्टीने अपुरा ठरतो हे त्यांचे म्हणणे खरे आहे. मात्र, कर्मयोग शब्दालाच बगल देऊन शक्तिपात हीच गीतेची दुसरी ' निष्ठा ' आहे हा लेखकाचा निष्कर्ष अजबच म्हटला पाहिजे. त्यासाठी ज्ञानेश्वरीतील त्याने दिलेली उद्धरणे सर्वथा अप्रस्तुत आहेत. ' कर्मयोग ' शब्दाचा योग्य अर्थ केल्यावाचून प्रस्तुत प्रश्नाचे उत्तर देताच येणार नाही. योगशास्त्रपरंपरेत कर्मशब्दालाही पारिभाषिक अर्थ असून त्याचा विचार स्वतंत्रपणे करावा लागेल. त्यामध्ये शक्तिपातमार्ग कितपत बसतो याचाही विचार ओघाने येईल.

– चि. त्र्यं. केंघे

---

# सार-संकलन

### विश्वविद्यालयांतील गोंधळ

विश्वविद्यालयांतून गोंधळ चालू आहे. सर्वत्र विद्यार्थी बंडखोर बनत आहेत. प्राचीन ध्येयांबद्दल गैरविश्वास दाखविला जात आहे. विद्वान लोकांच्या डोक्याला ताप उत्पन्न झाला आहे. जर्मनीत रस्त्यावर आलेल्या विद्यार्थ्यांनी ट्रॅमगाडया जाळल्या, बर्लीनमध्ये मोर्चे काढून त्यांनी नागरिकांचा रोष पत्करला. फ्रान्समध्ये विद्यार्थ्यांनी वसतिगृहात निदर्शने करून गोंधळ माजवला, तो इतका की पोलीस बोलवावे लागले. अनेक ठिकाणी ' विद्यापीठाच्या कामात विद्यार्थ्यांना भरपूर वाव देण्यात यावा व त्यांच्या म्हणण्याप्रमाणे विद्यापीठे चालवावी अशा मागण्या करण्यात येत आहेत. या मागण्याविरुद्ध लंडन टाइम्सने संपादकीय लिहून विद्यार्थ्यांना ' असे अधिकार देणे म्हणजे शैक्षणिक जबाबदारी टाळणे ' होईल असे बजावले आहे.

विद्यार्थीचळवळीतील जे आघाडीचे विद्यार्थी आहेत त्यांना काय शिकवावे, कसे शिकवावे व कोणी शिकवावे या सर्व गोष्टी ठरविण्याचे अधिकार पाहिजे आहेत. काही ठिकाणी परीक्षा घेण्याचे व विद्यार्थ्यांच्या प्रश्नपत्रिका तपासण्याच्या आपल्या हक्कांचे शिक्षकांना ' बुद्धिनिष्ठ कामगार कौन्सिल ' विरुद्ध संरक्षण करण्याची पाळी आलेली आहे. मध्ययुगीन इटालियन विद्यापीठातील प्राध्यापकांना लग्न करण्यास सुद्धा विद्यार्थ्यांची परवानगी घ्यावी लागत असे; ते सुवर्णयुग पुन्हा उजाडेलही कदाचित ! लंडन शहरात एक ' विरोधी विद्यापीठ ' ( anti university ) काढण्यात आलेले आहे. ब्रिटनमध्ये जर्मनीप्रमाणे एकही विद्यार्थी मारला गेला नाही, किंवा इस्तंबूलप्रमाणे एकही रेक्टर घेरावला गेला नाही; पण लीस्टर विद्यापीठात झालेल्या घटना काळाची पावले दाखवणाऱ्या आहेत.







## सार–संकलन

विद्यार्थ्यांच्या अडचणी : निरनिराळ्या वैचारिक गटांनी या सर्व घटनांचे खापर समाजशास्त्रज्ञांच्या डोक्यावर फोडले आहे. एक समाजशास्त्रज्ञ या नात्यानेच मी असे म्हणतो की, या गडबड माजवणाऱ्याच नव्हे तर फार मोठ्या विद्यार्थीसमाजाच्या व्यक्तिगत व सामाजिक अडचणी बहुतेकांना समजलेल्या नाहीत. ठिकठिकाणी होणाऱ्या उद्रेकांची कारणे, ठिकाणाप्रमाणे भिन्न असतील ! हे उद्रेक म्हणजे एक मोठे फुटलेले गळू आहे; ते जर फुटले नाही तर हा 'पू' सर्व शरीरात पसरण्याची शक्यता आहे. समाजशास्त्रज्ञ, या रोगाचे कारण नाहीत. त्या रोगाचे वर्णन करण्यास योग्य अशी शब्दसामुग्री त्यांनी पुरविली आहे इतकेच. समाजशास्त्र, विद्यार्थ्यांत वेगळेपण निर्माण करीत नाही पण आपले स्थान शोधण्यात व ते सापडवून देण्यास मदत करते. आणि आपले स्थान सापडविण्याची गरज, कामगार-वर्गातील किंवा गरीब मध्यम वर्गातील, पुढे जाण्यास उत्सुक असलेल्या पुरुष विद्यार्थ्यास सर्वात जास्त असते. समाजशास्त्र ध्येयवादी घराची कल्पना उभी करते पण प्रत्यक्ष घर मात्र लीस्टरसारखी विद्यापीठे तयार करतात. त्यातच हे विद्यार्थी जर अल्पसंख्यांक गटाचे असतील तर आणखीनच कठीण परिस्थिती निर्माण होते. कारण एका बाजूला त्यांना सामाजिक जीवनाची ओढ वाटत असते तर दुसऱ्या बाजूस एकाकी रहाण्याची कोशीस चालू असते.

या धडपडणाऱ्या विद्यार्थ्यांना आपल्यापुढे काय वाढून ठेवले आहे ते माहीत होते असे म्हणण्यात काहीही अर्थ नाही. त्यांना खरोखरच कसलीही कल्पना नसते. त्यातील अनेकांना सेंट क्लेमंट डेन म्हणजे कॉलेजचे चर्च वाटते. सर सिडने केन उंच टेबलावर उभे राहून रोज लॅटीन प्रार्थना म्हणणार असे वाटते किंवा आपले लंडन मधील वास्तव्य म्हणजे वाटर्लू ब्रिज खालील टेम्स नदीतील जलविहाराचे स्वप्न वाटते. अशा तऱ्हेची अनेक स्वप्ने घेऊन हे विद्यार्थी नव्या समाजात येण्याचे धाडस करतात. त्यांच्या आशा आकांक्षा काय असतात, त्या कितपत प्रत्यक्षात येतात, त्यांची किती स्वप्ने वास्तवाच्या दगडावर फुटतात याची कोणासही कल्पना नाही. एक गोष्ट मात्र खरी की परिस्थितीबद्दलच्या अज्ञानाबरोबरच वास्तवाबद्दलचेही त्यांच्यात अज्ञान असते.

मानसिक ताण : या विद्यार्थ्यांचे अज्ञान व त्यांचेवर पडणारा ताण यातून त्यांचेबद्दल सहानुभूती निर्माण व्हावयास पाहिजे. विश्वविद्यालयात प्रवेश मिळविणाऱ्या या पहिल्या पिढीशी, पिढ्यानुपिढ्या ऑक्सफोर्ड किंवा केंब्रीजसारख्या विद्यापीठात जाणाऱ्या मध्यम किंवा वरिष्ठ मध्यम वर्गातील विद्यार्थ्यांच्या पिढीची तुलना करा ! या मुलांना विद्यापीठातील काळ म्हणजे पुढील आयुष्याकडे नेणारा एक सलग मार्ग वाटतो. त्यात विशेष वेगळे असे त्यांना काहीच वाटत नाही. पण पहिल्या वर्गातील मुलांना विद्यापीठातील अनुभव हा आपल्या आयुष्यातील एक महत्त्वाचा काळ वाटतो. त्यामुळे त्यांच्या भविष्यकामाला एक विशिष्ट वळण लागणार असते. विद्यापीठात प्रवेश केलेल्या विद्यार्थ्यांना आपली तेथील प्रगती म्हणजे समाजाने त्यांच्या भवितव्याबद्दल दिलेला निर्वाळा असतो. त्यावर त्याचे समाजातील स्थान अवलंबून असते. नुसते शैक्षणिक यश मिळविण्यापेक्षा 'चांगला माणूस' असणे जास्त चांगले असते हे त्याला पटत नाही. त्या शिवाय घर, विद्यापीठ व प्रत्यक्ष काम या परस्परविरोधी तीन विद्यापीठांना जोडणारा एकमेव बिंदू म्हणजे हा विद्यार्थी असतो. या तिन्हींच्या धकाधकीला तो कसेतरी तोंड देतो. खूप मेहनत करून आपले शिक्षण संपवतो, एखाद्या उद्योगधंद्यात शिरतो. पण हे सर्व फार अल्पसंख्य विद्यार्थ्यांना शक्य होते.

### मर्यादित जग

पब्लिक स्कूल मधील मुलगा चांगला निपजतो. त्याची वर्तणूक उत्तम असते, तो खिलाडू असतो, त्याच्यामध्ये नेतृत्वाचे गुण येऊ शकतात, त्यात नवल नाही. परिस्थितीने बांधल्या गेलेल्या कामगारवर्गातील मुलाचे जग लहान असते, त्याला मर्यादा असतात. त्यातल्यात्यात मोठे होण्याच्या त्याच्या महत्त्वाकांक्षा असतात. त्या जगात मिळणाऱ्या यशापयशावर त्याचे भवितव्य अवलंबून असते. पण त्यातल्या, ज्या, थोड्यांच्या महत्त्वाकांक्षा, या मर्यादा सोडून उंचावलेल्या असतात त्यांचे काय ? त्यांची भिस्त सामाजिक व राजकीय न्यायावर असते. या गटातील किंवा निर्वासित गटातील विद्यार्थ्यांचा प्रश्न मोठा बिकट आहे. त्यातच इंजिनिअरिंगसारखे विषय घेऊन शिकलेल्या मुलांचे आयुष्य सुकर असते. त्यांना विचार करण्यापेक्षा ज्ञान मिळ-








विण्यास शिकवले असते; त्यांचा सामाजिक शास्त्रांशी क्वचितच संबंध येतो. त्यांच्या बुद्धीच्या झेपेला मर्यादा घातल्या जातात, त्यांच्या कामामध्ये सामाजिक जीवनाचा वा व्यक्तिगत आयुष्याचा विचार करण्याची गरज नसते. त्यांना समाज व व्यक्ती यांतील परस्पर-संबंधासंबंधी विचार करण्याची गरज पडत नाही. त्यांचे भविष्य ठरून गेलेले असते. विश्वविद्यालयीन शिक्षण व प्रत्यक्ष व्यवहार यात त्यांना फारशी तफावत दिसत नाही, जाणवत नाही. परंतु इतर विषय घेणारांच्या बाबतीत हा फरक प्रकर्षाने जाणवतो. त्यांनी अभ्यासलेल्या विषयातून त्यांना मानवतावादी, बुद्धिवान लोकांच्या जीवनात डोकावण्याची संधी मिळते. व आपण प्रत्यक्षात जगत असलेले जीवन किती वेगळे आहे याचा अनुभव येतो.

## नवे जीवन

ऑक्सफोर्ड किंवा केंब्रिजच्या बाहेर ही मानवतावादी व बुद्धिवादी जीवनपद्धति क्वचितच पहावयास मिळते. परंतु विश्वविद्यालयात येणाऱ्या सर्वसामान्य विद्यार्थ्यांचा घराशी असलेला संबंध काहीसा जबरदस्तीनेच तोडला जातो; तो संपूर्ण तुटू शकत नाही. त्यांना नव्या जीवनाचे अस्पष्ट दर्शन होऊ लागते. व त्यामुळे त्याबद्दलचे कुतूहल व औत्सुक्यही वाढू लागते. विश्वविद्यालयीन जीवनात मिळणारा मोकळा वेळ काहीसा फसवा असतो. कारण शैक्षणिक जीवनात, शिक्षण, संशोधन, त्यासाठी जरूर असलेल्या परिषदा व भेटीगाठी, व्यवस्थापन व एकमेकाशी जुळवावे लागणारे संबंध या गोष्टी नुसता वेळच घेतात असे नाही तर नव्या माणसाच्या मनावर त्याचा ताणही पडतो. त्यातूनच एखादा वेळ शिक्षक भेटलाच नाही तर तो मुद्दामच आपल्याकडे दुर्लक्ष करीत आहे. अशी भावना निर्माण होते. त्यातून वैफल्य निर्माण होण्याची शक्यता उत्पन्न होते. काही वेळा असे दुर्लक्ष मुद्दामही केले जाते.

कोणत्याही निर्वासित माणसाबद्दल हे सर्व म्हणता येईल. आताच्या बहुसंख्य विद्यार्थ्यांना निर्वासितांचे काही प्रश्न लागू असले तरी या दोन्ही गटात पुष्कळच गोष्टी भिन्न आहेत. हा विद्यार्थी भविष्यातील उच्चयांशी ( elite ) असतो. 'आम्ही राष्ट्रांचे भविष्य आहोत भवितव्य आहोत' असे कित्येक विद्यार्थी समजतात. 'त्यामुळे शासनकर्ते आम्हाला काहीही करू शकणार नाहीत' असेही त्यांना वाटते. सामान्य नागरिकाला विद्यार्थी हा एक विशेष सवलती असलेला ज्ञानाच्या व बुद्धिवादी जीवनाच्या दुग्धसागरात पोहणारा वेगळाच वर्ग वाटतो. पण या विद्यार्थ्यांना मात्र आपली परिस्थिती फारशी अनुकूल वाटत नाही.

## कामगारवर्गाशी नाते

आपल्याला समाजात सर्व काही मिळत नाही असे त्यांना का वाटते ? सध्याच्या समाजात एक मोठी विलक्षण परिस्थिती निर्माण झालेली आहे. ज्यांना समाज खरोखरच काहीही देत नाही, जे संपूर्णपणे रिक्त आहेत त्यांना त्याचे काहीच वाटत नाही; उलट ज्यांच्याजवळ बरेचसे आहे पण ज्यांना थोडेफार मिळू शकत नाही ते मात्र बेचैन होतात, सामाजिक उद्रेकास कारणीभूत होतात. खराखुरा कामगारवर्ग हा नेहमी सनातनी असतो. जुनी सामाजिक मूल्ये मानणारा असतो. विद्यार्थ्यांतील काही उत्तमांशी विद्यार्थी आपण कामगार वर्गाचे आहोत असे समजतात. तसे वागण्याचा प्रयत्न करतात. कामगारवर्गातून बाहेर पडून मध्यमवर्गात प्रवेश मिळविण्याची धडपड करणारा कामगार, आपली स्थानिक गाऱ्हाणी सर्व कामगार-वर्गावर लादतो. त्यांचा संबंध सत्य व न्यायाशी जोडतो. सर्व जगभर हेच चालू असते. विद्यार्थीवर्गाचेही तसेच होत आहे. विद्यार्थ्यांना बोलताना ऐकले तर असे वाटू लागते की व्हिएटनामचे युद्ध हॉटनस्ट्रीटवर लढले जात आहे, विद्यार्थीचळवळ व जगातील काळी शक्ती एकच आहेत. थोडक्यात म्हणजे जगात सध्या तीनच महत्त्वाचे प्रश्न आहेत. व्हिएटनाम, ऱ्होडेशिया व विद्यार्थी.

आपणच फक्त बरोबर आहोत, शुद्ध आहोत अशा भावनेला कोठेतरी सामाजिक पाठिंबा लागतो, स्थान लागते. कामगारवर्ग व आपण एकच आहोत असे मानण्यात या दोन्ही गोष्टी मिळून जातात. पौगंडावस्था व प्रगल्भावस्था या दोन अवस्थांना जोडणारा हा दुवा होऊ शकतो. कोठल्याही देशात स्वप्नात पाहिलेले घर अस्तित्वात असत नाही. चीनमध्ये सुद्धा नाही पण कामगारवर्गाचे चित्र कल्पनेने पाहिजे तसे निर्माण करता येते. त्या वर्गाबरोबर रहाणे सुरक्षित असते त्यामुळे शाळा-कॉलेजाबाहेरच एक स्वतंत्र व्यासपीठ विद्यार्थ्यांना मिळते. ते भ्रष्ट न होणारे कायमस्वरूपाचे व विशुद्ध रहाणारे असते. जाज्वल्य पण गूढ अशा शब्द-










प्रयोगांच्या व समाजशास्त्रीय विश्लेषणाच्या कपड्या-खाली ते झाकलेले असते. त्यात घरातील साध्यासुध्या गैरसमजुतीबद्दल तुच्छता दाखविता येते तर शैक्षणिक जीवनातील भ्रष्टाकारावर टीका करण्यास भरपूर वाव असतो. आपले मानदंड म्हणून मानलेले शिक्षकसुद्धा या भ्रष्टाकाराचे बळी असतात, ते खरेखुरे देव नसून मानवच असतात याचाही साक्षात्कार विद्यार्थ्यांना तेथे होतो. विश्वविद्यालयाबद्दल त्यांची काय कल्पना असते हे सांगणेसुद्धा कठीण झाले आहे. त्यांतील अनेकांची ग्रहणशक्ती बेताचीच असली तरी त्याची जाणीव त्यांना असत नाही. विश्वविद्यालये त्यांच्या मनातून उतरल्यास नवल नाही.

अनेक वेळा या विद्यार्थ्यांवर घरातील वडील माणसांचे वजन असत नाही. त्यांचेबद्दलचा आदर नष्ट झालेला असतो. त्यांची जागा विश्वविद्यालयातील पितृतुल्य माणसे घेतील अशी आशा निर्माण झालेली असते. ही मोठी माणसे आपल्याला जवळ करतील, आपल्याला सांभाळतील असा विश्वास वाटत असतो, पण प्रत्यक्ष अनुभव तसा येत नाही. त्यातून कोणी उच्चनीचतेच्या भावनेची नुसती कल्पना पुढे केली तर मन साशंक होते. त्यामुळे कोणत्याही धंद्यात किंवा नोकरीत शिरताना आपण वरिष्ठ जागेवरच चटकन जावे असे वाटते. तसे न जमल्यास आपण प्रौढ होऊ नये, आपली विद्यार्थीदशा संपूच नये असे वाटते. त्यातून पदव्युत्तर शिक्षणाचा मार्ग सापडतो. विश्वविद्यालयाला भरपूर शिव्याशाप देत असतानाच आपले तेथील वास्तव्य निदान दोन वर्षांनी वाढवण्याची तरी त्यांना गरज वाटते त्यासाठी त्यांची धडपड असते.

त्यातल्या त्यात कनिष्ठ मध्यमवर्गातील विद्यार्थ्यांचे फारच हाल होतात. 'तुम्ही कामगार वर्गातील असलात तर तुम्ही कसेही वागू शकता, मध्यमवर्गाचे असलात तर चक्रमपणे वागलात तरी चालेल पण कनिष्ठ मध्यम वर्गाचे असलात तर व्यवस्थितच वागले पाहिजे.' असा दंडक असतो. व्यक्तिशः प्रत्येक विद्यार्थी चांगला असतो. पण ते जेव्हा गटागटाने वावरतात तेव्हा एकमेकावर इंप्रेशन मारण्याकरता ते अनेक गोष्टी बरळतात. त्यांची परिस्थिती काहीशी चमत्कारिक असते. त्यामुळे त्यांचेपैकी काही बिघडतात, बिथरतात. त्यांचा उत्साह दांडगा असतो. त्याला योग्य वळण लावल्यास त्यांचे हातून सत्कृत्ये घडतात. आपली विश्वविद्यालये चांगली नाहीत किंवा वीस टक्के विद्यार्थी विश्वविद्यालयात प्रवेश घेण्यास नालायक आहेत असे म्हणण्यात अर्थ नाही.

गतकाळात अशा तऱ्हेच्याच वातावरणात राजकीय किंवा धार्मिक अतिरेकी वृत्ती फोफावल्या आणि आता तर नुसता मार्क्सवाद नव्हे तर अराजकवाद, एक्झिस्टेंशियालिझम, बुद्धिझम यांच्यासारख्या अनेक वादांचे वारे वातावरणात वहात आहेत. सध्या विद्यार्थीजगात एक नवा खेळ अस्तित्वात आलेला आहे व तो म्हणजे आपण शुद्ध पवित्र कामगार असून आपणाला कोणीही भ्रष्ट करू शकणार नाही अशी भूमिका घ्यावयाची. यात एक पथ्य पाळावयाचे असते. व ते म्हणजे आपल्या डाव्या बाजूला कोणीही रहाणार नाही याची खबरदारी घ्यावयाची. सर्व लोक उजव्या बाजूस. जो कोणी आपल्या डाव्या बाजूला एखाद्या विद्यार्थ्यालासुद्धा जाऊ देईल तो आपटलाच असे समजावे. पण सध्या अस्तित्वात असलेली कोणतीही राजकीय पद्धती यात बसत नाही. सोव्हिएट रशिया तर नाहीच नाही क्युबा कदाचित बसू शकेल.

हा विद्यार्थ्यांचा प्रश्न हाताळण्यास फार मोठा संयम व शांत वृत्ती पाहिजे. ते चंद्राकरता हट्ट धरत आहेत म्हणून त्यांना काहीच द्यावयाचे नाही असे करून चालणार नाही. त्यांच्या प्रतिनिधींना विश्वविद्यालयात जास्त अधिकार दिल्याने किंवा शिस्त ढिली केल्याने सर्व काही साधेल असे वाटत नाही. कारण ज्या संस्थामध्ये शिस्त कमी आहे त्यातच विद्यार्थ्यांचे गैरशिस्त वर्तन वाढत आहे. आपण त्यांना स्वतंत्र अस्तित्व देऊन प्रौढ बनविणे योग्य होणार नाही. कारण प्रत्यक्ष व्यवहारात प्रौढाप्रमाणे वागणे त्यांना जमणार नाही. ते जर स्वतंत्र असते तर आपल्यावर अवलंबून रहाण्याची त्यांना गरज वाटली नसती, शिक्षकवर्गावर ते विसंबून राहिले नसते. शिक्षक आम्हाला पाहिजे तेव्हा भेटले पाहिजेत या त्यांच्या मागणीला अर्थ राहिला नसता. आपण त्यांना स्वतःवर स्वतःच्या पद्धतीने शिस्त लादून घेण्यास समर्थ केले पाहिजे, त्यांचेवर वेळेची बंधने घातली पाहिजेत, त्यांना शिकविण्यास आपण






शिकले पाहिजे व त्यांना शिकण्यास शिकवले पाहिजे.

दि लिसनर लंडन ७ मार्च १९६८

## मिठी की गळेचेपी ?

झेकोस्लोव्हाकियाने रशियाला काळजीत टाकले आहे. तेथील परिस्थिती रशियाच्या दृष्टीने इतकी प्रक्षोभक आहे की त्यांनी पोलंड, हंगेरी, पूर्वजर्मनी व बल्गेरिया यांची तातडीची सभा मास्कोत बोलावली आहे. शांततेचे मार्ग किंवा मानसिक दबाव आणण्या-पलीकडे जाण्याची अजूनतरी रशियाला गरज वाटत नाही. आपण रशियाशी एकनिष्ठ असून वॉर्सा-तहाचे विश्वासार्ह सभासद आहोत अशी ग्वाही झेको-स्लाव्हेकियाने दिली आहे. त्यामुळे रशियाची परि-स्थिती काहीशी नाजूक झाली आहे. झेकोस्लाव्हे-कियातील उदारमतवादी चळवळ इतरत्र पसरण्याची रशियाला भीती वाटत असली तरी त्यांचेवर उघड उघड दबाव आणल्यास त्याचा परिणाम विपरीत होईल याची रशियाला खात्री आहे. म्हणूनच सध्या झेकोस्लाव्हेकियाच्या दौऱ्यावर असलेल्या सोव्हिएट जनरलने रशिया त्यांच्या अंतर्गत व्यवहारात ढवळा-ढवळ करणार नाही अशी घोषणा केली आहे.

झेकोस्लाव्हेकियाच्या नव्या नेतृत्वाशी वागताना रशिया गरम व थंड वर्तणुकीचा प्रयोग करीत आहे. एकदा कडक वागून नंतर पुन्हा अंजारून गोंजारून घेऊन तेथील चळवळ योग्य मार्गावर ठेवता येईल असे त्यांना वाटत आहे. याकरता दुबेक हा सर्वस्वी योग्य नेता आहे असे त्यांनी ठरविलेले दिसते. गेल्या आठवड्यात श्री. दुबेकबद्दल अनेक वर्तमानपत्रांनी गौरवास्पद लिखाणे लिहिली. आपण श्री. दुबेक यांना चुचकारून घेतले तर ते आपले जास्त ऐकतील असे रशियन नेत्यांना वाटत आहे असे वाटते. 'भांडवल-शाही उदारमतवादाला जर फाजील प्राधान्य दिले व कम्युनिझमचे नेतृत्व कमी केले तर त्याचा परिणाम भयंकर झाल्यावाचून रहाणार नाही या आशयाचा लेख इझनेस्ताने नुकताच प्रसिद्ध केला आहे. तो कोणाकरता आहे हे उघड आहे. त्याचप्रमाणे साम्राज्य-वादी, समाजवाद्यांच्या गोटात शिरून वैचारिक सुरुंग पेरत आहेत असा आरोप प्रवदाने केला आहे. आणखी एका वर्तमानपत्राने लेनिनच्या खुनाचा कट करण्याचा आरोप थॉमस मास्यार्क यावर केल्यामुळे झेकोस्ला-व्हेकियातील वातावरण गरम झाले आहे.

झेकोस्लाव्हेकियाबद्दल रशियाला भीती वाटत आहे हे स्पष्ट आहे. पोलंड व पूर्व जर्मनी पण बेचैन झाल्या-सारखे दिसत आहेत. पोलंडमधील विद्यार्थी व बुद्धिमन्त झेकोस्लाव्हेकियाचा कित्ता गिरवतील अशी भीती गोमुल्का यांना वाटत आहे तर श्री. दुबेक यांचा प. जर्मनीबद्दलचा दृष्टिकोन हेर उलब्रिच यांना सतावीत आहे. दोन्ही देशातून झेकोस्लाव्हेकियाविरुद्ध मोहीम सुरू झाली आहे. त्याउलट हंगेरी दुबेकला संशयाचा फायदा देण्यास तयार आहे. मास्कोच्या सभेमध्ये कादारने झेकोस्लाव्हेकियांची बाजू घेतली अशीही वदंता आहे. रशिया व झेकोस्लाव्हेकिया यांना एकत्र आणण्याचे काम त्यांचेकडे आले. आहे की काय न कळे!

—दि इकॉनॉमिस्ट १८-५-६८

## फ्रान्सला झालेली घाई

दहा वर्षापूर्वी जनरल द गॉल सत्तारूढ झाला. उजव्यांनी 'अल्जेर फ्रान्सी'च्या घोषणा केल्या तर डाव्यांनी 'झूमधील जिराफ' अशी त्यांची संभावना केली. गेल्या दहा वर्षात फ्रान्सची भरभराट झाली यात मात्र वाद नाही. १९५८ साली केलेल्या फ्रॅंकच्या अवमूल्यनात या यशाची गुरुकिल्ली आहे असे म्हणणे अतिशयोक्तीचे होणार नाही. सुरवातीस या कृत्याबद्दल अनेक अर्थशास्त्रज्ञांनी शंका व्यक्त केली पण १९५९ नंतर त्यातील शहाणपण सर्वांच्या लक्षात आले. जादू झाल्यासारखी फ्रान्सची प्रगती होण्यास सुरवात झाली व अनेकांनी हे अवमूल्यन नमुनेदार ठरवले. पण १९६३ नंतर परिस्थिती बदलू लागल्याची चाहूल लागू लागली. वरवर 'फ्रान्सची परिस्थिती इतकी चांगली कधीच नव्हती' असे ऐकू येत असले तरी आतून भुंगा पोखरू लागला होता. आज द गॉलचे सरकार पेचात पडले आहे, धोक्यात आले आहे.

कोठल्याही ब्रिटिश माणसाने फ्रान्सबद्दल बोलताना सावधगिरीने बोलले पाहिजे. आपण दोष शोधण्याचा प्रयत्न करीत आहोत असा फ्रान्सला संशय येणे बरोबर होणार नाही. गेल्या दहा वर्षातील ब्रिटनशी फ्रान्स-








बद्दलची भावना एका बाजूस कौतुकाची व दुसऱ्या बाजूस वैमनस्याची होती. द गॉलच्या काही वक्तव्याबद्दल चीड येत असताना त्याच्या काही यशस्वी कार्याबद्दल ब्रिटनला साश्चर्य हेवा वाटत होता. आपल्या जुन्या दोस्ताला गतवैभव परत मिळाल्याबद्दल आनंद वाटत होता तर त्यांच्या चुकलेल्या धोरणाबद्दल तुच्छता वाटत होती अशा अनेक परस्परविरोधी भावना ब्रिटनमध्ये निर्माण होत होत्या. पण ब्रिटनने दक्षिण फ्रान्सकडे लक्ष दिले नाही. द गॉलिस्ट फ्रान्सच्या आर्थिक जीवनाचा अभ्यास केला नाही. काही बाबतीत फ्रान्सने मिळवलेले यश जगाला नमुनेदार वाटावे असे आहे तर काही ठिकाणी संपूर्ण गोंधळ निर्माण झालेला आहे.

**मनूरशक्तीचा अपव्यय :** फ्रान्समधील गोंधळांचे एक महत्त्वाचे कारण म्हणजे ब्रिटन किंवा जर्मनी यांचेप्रमाणे फरान्समधील मजूर निरनिराळ्या धंद्यात योग्यप्रमाणात गुंतलेले नाहीत. तेथील मजूरशक्ती विस्कळित आहे. यातील १७ टक्के मजूर शेतीमध्ये गुंतलेले असून त्यांची उत्पादनशक्ती इतर धंद्याच्या निम्याने आहे. याशिवाय इतर राष्ट्रांच्या मनात फार मोठ्या संख्येने फ्रान्समधील मजूर स्वतःच्या धंद्यात किंवा घरकामात गुंतलेले आहेत. फ्रान्समध्ये लहान दुकानदार व फुटकळ व्यापार करणारांचा पण एक वर्ग असून त्यांची परिस्थिती हलाखीची आहे, त्यांची उत्पादनक्षमता पण अत्यंत अल्प आहे. २८ टक्के फ्रेंच मजूर कोणत्या ना कोणत्या कारखान्यातून उत्पादन करीत असून ( ब्रिटन व जर्मनीत हे प्रमाण ३५ टक्के आहे ) त्यातील बरेचसे लहान शहरातून किंवा खेड्यातील कारखान्यात काम करीत आहेत. फ्रान्समधील ५० टक्के लोक अजूनही २००० वस्तीच्या लहान लहान कम्यून्समध्ये रहातात. फ्रान्सचे क्षेत्रफळ ब्रिटन किंवा जर्मनीपेक्षा मोठे असले तरी तेथील लोकसंख्या या दोन्ही देशापेक्षा कमी आहे.

**वाढलेले राष्ट्रीय उत्पन्न :** पण या सर्व गोष्टी लक्षात घेऊनसुद्धा फरान्सचे दर डोईस राष्ट्रीय उत्पन्न जवळ जवळ ब्रिटन एवढे आहे. सर्वसाधारण फ्रेंच माणसाचे अन्न ब्रिटिश माणसाच्या अन्नापेक्षा चांगले असते. फरान्समध्ये ब्रिटनपेक्षा जास्त लोकांचे जवळ मोटारी आहेत. ( ब्रिटनमध्ये हजारास १७८ तर फ्रान्समध्ये २१४ ) पण ब्रिटिश माणसाचे घर जास्त मोठे व हवाशीर असते तर फरान्समधील बहुतेक सर्व मध्यमवर्गीय लोकांना समुद्राजवळ लहानसे का होईना पण दुसरे घर असते. ब्रिटिश लोकांच्या घरात टेलिव्हिजन टेलिफोनसारख्या वस्तु जास्त असतात. ब्रिटिश हे जास्त श्रीमंत राष्ट्र आहे असा अजूनही समज आहे. ब्रिटनमधील बालमृत्यूंचे प्रमाण फरान्सच्या मानाने पुष्कळच कमी असून तेथे वीजपुरवठाही जास्त प्रमाणात वापरला जातो. फ्रान्सचे राष्ट्रीय उत्पन्न कल्पनेपेक्षा बरेच अधिक आहे, हे मात्र निर्विवाद.

यातून दोन गोष्टी सिद्ध होतात. एक तर फ्रेंच उद्योगधंदे ब्रिटन किंवा जर्मनी यांच्या एवढेच किंबहुना थोडेसे जास्तच कार्यक्षम आहेत. त्यातील व्यवस्था उत्तम असून मजूरशक्तीचा वापर लवचिकपणे केला जातो. म्हणूनच उद्योगधंद्याकडे कमी लक्ष देऊनसुद्धा फ्रान्सचे राष्ट्रीय उत्पन्न समाधानकारक आहे. दुसरी गोष्ट म्हणजे फरान्समध्ये जर आधुनिक दृष्टिकोन असलेले सरकार अस्तित्वात आले तर कमी उत्पादन असलेल्या अनेक उद्योगधंद्यातील मजूरशक्ती विशेषतः शेतमजूरांची शक्ती आधुनिक उद्योगधंद्यात घालून फ्रान्सची औद्योगिक प्रगति झपाट्याने करणे शक्य होईल फ्रान्सची फार मोठी लोकसंख्या सध्या २० वर्षे वयाच्या आतील असल्यामुळे १९६५ ते ८० च्या काळात फ्रान्सची मजूरशक्ति १३½ टक्यांनी वाढणार आहे. या सर्वांचा फायदा पॅरिसमध्ये बसलेल्या सेंट्रल इकॉनॉमिक मॅनेजर्सनी घेतला तर फ्रान्सची भरभराट होण्यास वेळ लागणार नाही. पण सध्याच्या फ्रेंच वातावरणात हे फक्त स्वप्न वाटत आहे. फ्रेंच सरकार या बाबतीत अडखळत आहे, चुका करीत आहे. एका बाजूला अस्तित्वात असलेल्या उद्योगधंद्यात डोळे दिपवणारे यश व दुसरे बाजूस फ्रेंच सरकारचे परिस्थितीचा फायदा घेण्यातील अपयश यामुळे फ्रान्सच्या राजकारणात व अर्थकारणात परस्परविरोध निर्माण झालेला दिसत आहे.

दि इकॉनॉमिस्ट १८ मे १९६८








रब्बी पिके निघाली... ...खरीप पिकांची उसाभर
आता सुरू होणार




# आठव्या महाराष्ट्र दिनाची हीच प्रतिज्ञा

प्रसिद्धि संचालक, महाराष्ट्र शासन, मुंबई.